शोधप्रकाशन ग्रंथमाला - ८४

# रेणुकगीताई

अनुष्टुभ् छंदोबद्ध

शेषनारायण देवाप्पा पसारकर

**शैवभारती शोधप्रतिष्ठान**
जंगमवाडी मठ, वाराणसी

रेणुकगीताई

शे॰ दे॰ पसारकर

Renuk Geetai (Marathi)

S. D. Pasarkar

ISBN : 978-93-82639-24-4

प्रकाशक :

शैवभारती शोधप्रतिष्ठान,

जंगमवाडी मठ, वाराणसी (उत्तर प्रदेश) २२१ ००१

स्थिरभाष : (0542) 2450546

अक्षरसंयोजन :

शिवशक्ती कम्प्यूटर प्रोसेस

जंगमवाडी मठ, वाराणसी (उत्तर प्रदेश) २२१ ००१



मुद्रक : जयंती प्रिंटर्स, ३७४, उत्तर कसबा, सोलापूर ४१३ ००७

प्रथमावृत्ती : आषाढ शु. १५, शके १९३८ / गुरुपौर्णिमा
१९ जुलै २०१६

प्रती : २०००

मूल्य : १०० रु.

श्रीमत्काशीविश्वाराध्यज्ञानसिंहासनाधीश्वर

## श्री १००८ जगद्गुरू डॉ० चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी

जंगमवाडी मठ, श्रीक्षेत्र काशी (वाराणसी)

# शुभाशीर्वचन

वीरशैव मराठी साहित्याचे गाढे अभ्यासक डॉ० शेषनारायण देवाप्पा पसारकर यांनी नुकत्याच रचलेल्या 'रेणुकगीताई' या ग्रंथाचे शैवभारती शोधप्रतिष्ठान, जंगमवाडी मठ, वाराणसी या संस्थेतर्फे शोधप्रकाशन ग्रंथमालेचे ८४ वे पुष्प म्हणून प्रकाशन करताना अतिशय आनंद वाटत आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ह्या मूळ संस्कृत अनुष्टुभ् छंदातील ग्रंथाचे त्याच छंदामध्ये मराठीकरण केलेली ही एक अपूर्व कृती आहे. अनुष्टुभ् हा संस्कृत साहित्यातील पहिला छंद मानला जातो. हा संस्कृतमधील अत्यंत प्रसिद्ध छंद असून रामायण-महाभारतापासून बहुतेक सर्व पद्यग्रंथ याच छंदामध्ये रचिलेले आहेत. या मूळ संस्कृत छंदाचे मराठीसारख्या लोकभाषेत अनुकरण करणे हे सोपे काम नव्हे. तरीदेखील मराठीमध्ये वामन पंडित, स्वातंत्र्यवीर वि० दा० सावरकर आणि आचार्य विनोबा भावे यांच्यासारख्या संस्कृतज्ञ मराठी विद्वान कवींनी अनुक्रमे 'गीता समश्लोकी', 'कमला' (खंडकाव्य) आणि 'गीताई' हे ग्रंथ मराठी अनुष्टुभ् छंदात रचलेले आहेत.

आदिकवी वाल्मीकींच्या मुखातून निघालेला हा संस्कृत छंद सतराव्या शतकामध्ये वामन पंडितांमुळे मराठी भाषेमध्ये अवतीर्ण झाला. त्यांचेच अनुकरण स्वातंत्र्यवीर सावरकर आणि आचार्य विनोबा भावे यांनी केले. विनोबाजींची 'गीताई' ही छंदोबद्ध रचना महाराष्ट्रात अत्यंत लोकप्रिय ठरली. याच सुप्रसिद्ध 'गीताई'चे वाचन डॉ० शे० दे० पसारकरांनी वर्षानुवर्षे केले. या छंदात आपणही लिहू शकू का, असा विचार बीजरूपाने त्यांच्या मनात होता. डॉ० पसारकरांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'वर ओवीरचना व अभंगरचना केल्यानंतर 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चा मराठी अनुष्टुभ् छंदामध्ये भावानुवाद करावा, अशी इच्छा आम्ही त्यांच्यासमोर व्यक्त केली. त्यावेळी त्यांनी मराठीत काही श्लोक रचून आम्हाला दाखविले. ते आम्हाला आणि काही मराठी

विद्वानांना अत्यंत आवडले. मग आम्ही 'तुमच्याकडून हे कार्य होऊ शकते, तुम्ही हे कार्य करा' असा आग्रह धरल्यामुळे डॉ० पसारकर सपत्नीक काशीला आले. काशीविश्वनाथ आणि जगद्गुरू विश्वाराध्य यांच्या सान्निध्यात त्यांनी काशीजंगमवाडी मठात लेखनकार्याचा शुभारंभ केला. आम्ही काशीला असताना त्यांनी केलेले लेखन ते दररोज आम्हाला वाचून दाखवीत असत. अत्यंत कठीण वाटणारे हे लेखनकार्य विश्वनाथ, माता अन्नपूर्णा आणि जगद्गुरू विश्वाराध्य यांच्या कृपेमुळे सहज पार पडले. अवघ्या दोन महिन्यांत ग्रंथ पूर्ण करून त्यांनी जगद्गुरू विश्वाराध्यांच्या गादीला समर्पित केला आणि दूरध्वनीवरून ग्रंथसिद्धीची वार्ता आम्हाला सांगितली. यावरून त्यांच्यामागे श्रीगुरुकृपेचे केवढे बळ आहे, याची कल्पना येईल.

'श्रीसिद्धान्तशिखामणी'वर 'जन्म हा अखेरचा', 'श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत', 'श्रीसिद्धान्तशिखामणी अभंगगाथा' आणि प्रस्तुत 'रेणुकगीताई' हे चार ग्रंथ डॉ० पसारकरांच्या लेखणीतून प्रकट झाले आहेत. डॉ० शे० दे० पसारकर हे वीरशैव साहित्यनिर्मितीत अग्रेसर आहेत. वरील ग्रंथांशिवाय 'श्रीमन्मथचरितामृत', 'श्रीरमतेराम-कथामृत', 'श्रीजगद्गुरू पंचाचार्य विजय', 'अभंग सिद्धायन', 'सिद्धरामायण', 'चंद्रसावली' इत्यादी काव्यरचनांबरोबरच त्यांनी कादंबरी, नाटक, स्पष्टीकरण-भाष्य, संशोधनलेखसंग्रह, याशिवाय 'श्रीलक्ष्मणगाथा', 'श्रीसिद्धरामेश्वरांची वचने', 'श्रीमन्मथशिवलिंगकृत परमरहस्य' इत्यादी ग्रंथांची संपादने असे विपुल लेखन केले आहे. त्यांच्या साहित्यसंपदेमुळे वीरशैव मराठी साहित्य अतिशय समृद्ध झालेले आहे. प्रस्तुत 'रेणुकगीताई' हे त्याचेच एक उदाहरण होय. मूळ संस्कृत भाषेतील 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे वाचन करताना संस्कृत वाचकांना जो आनंद मिळतो तोच आनंद ह्या 'रेणुकगीताई'मुळे मराठी वाचकांना मिळणार आहे. या ग्रंथाचे मूळ रचनाकार शिवयोगी शिवाचार्य यांनी शे० दे० पसारकरांच्या अंगात संचार करून त्यांच्याकडून हा ग्रंथ मराठीमध्ये लिहवून घेतला आहे, असे म्हटले तरी चालेल. खुद्द पसारकरांची भावनासुद्धा अशीच आहे. मराठी वाचकांना 'श्रीसिद्धान्त-शिखामणी' समजून घेण्यासाठी पसारकरांचे या ग्रंथावरील सर्व साहित्य अत्यंत उपयुक्त ठरणार आहे.

प्रस्तुत 'रेणुकगीताई'मध्ये 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील २१ परिच्छेदांतील विषयांचे

त्यांनी पूर्वपीठिका, अंगस्थले/लिंगस्थले व उपसंहार असे तीन विभाग केले आहेत. मूळ संस्कृत १४०५ श्लोकांतील आशय त्यांनी मराठीत १३०१ श्लोकांमध्ये आणलेला आहे. या ग्रंथातील मराठी श्लोक अर्थ व रचना या दृष्टीने संस्कृत श्लोकांइतकेच सरस झालेले आहेत. उदा०-

१. बहुजन्मकृतैः पुण्यैः प्रक्षीणे पापपिंजरे।
शुद्धान्तःकरणो देही पिण्डशब्देन गीयते।। श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.३२
पुण्य केले बहू जन्मी क्षीणला पापपिंजरा।
शुद्धान्तःकरणाचा जो जीव तो पिंड बोलिला।। रेणुकगीताई, १९१

२. प्रसाददेव सा भक्तिः प्रसादो भक्तिसंभवः।
यथैवांकुरतो बीजं बीजतो वा यथांकुरः।। श्रीसिद्धान्तशिखामणी, ९.११
लाभे शिवप्रसादाने भक्ती भक्तीमुळे कृपा।
बीजातूनि जसा कोंब बीज कोंबातुनी जसे।। रेणुकगीताई, ४१३

३. दीपं विना यथा गेहे नान्धकारो निवर्तते।
ज्ञानं विना तथा चित्ते मोहोऽपि न निवर्तते।। श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.३४
दीपावाचूनि नाशेना जसे घरातले तम।
जाईना मोह तैसाच ज्ञानाविण मनातला।। रेणुकगीताई, ८६५

४. यथा स्वप्नकृतं वस्तु प्रबोधेनैव शाम्यति।
तथा शिवस्य विज्ञाने संसारं नैव पश्यति।। श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.११
जागे होताक्षणी वस्तू स्वप्नातली विरे जशी।
तसे होता शिवज्ञान दिसेना विश्वजाल हे।। रेणुकगीताई, ९२३

५. नीडस्थितो यथा पक्षी नीडाद्भिन्नः प्रदृश्यते।
देहस्थितस्तथात्मायं देहादन्यः प्रकाश्यते।। श्रीसिद्धान्तशिखामणी, १८.२४
पक्षी खोप्यातला जैसा भिन्न खोप्याहुनी दिसे।
तसा देहाहुनी भिन्न अंतरात्मा प्रकाशतो।। रेणुकगीताई, १०१८

वरील उदाहरणांवरून संस्कृत श्लोक मराठीतही कसे प्रासादिक व अर्थसुभग उतरले आहेत, याची कल्पना येईल.

सोळाव्या शतकापासूनचे वीरशैव मराठी साहित्य उपलब्ध झाले आहे. या साहित्यातील 'रेणुकगीताई' ही अनुष्टुभ् छंदोबद्ध पहिली कृती आहे. या ग्रंथामुळे मराठी वीरशैव साहित्यातील अनुष्टुभ् छंदोरचना करणारे डॉ० शे० दे० पसारकर हे आद्यकवी ठरले आहेत. मराठी वीरशैव बांधव फारच भाग्यवान आहेत. कारण 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा ग्रंथ गद्य भावानुवाद, 'जन्म हा अखेरचा' (आशीर्वचने), 'श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत' (ओवीबद्ध), 'श्रीसिद्धान्तशिखामणी अभंगगाथा' (अभंगबद्ध) आणि आता 'रेणुकगीताई' (अनुष्टुभ् श्लोकबद्ध) अशा विविध रूपांत मराठी वाचकांसाठी अवतीर्ण झाला आहे. अर्थातूच हे सारे डॉ० पसारकरांच्या मुळे घडले. पसारकरांच्या अन्य साहित्याचे सद्भक्तांनी स्वागत करून त्यांची जशी पारायणे केली त्याचप्रमाणे त्यांची ही 'रेणुकगीताई'देखील ते आदरपूर्वक स्वीकारतील, असा आम्हाला विश्वास वाटतो.

या अनुष्टुभ् छंदोबद्ध ग्रंथसिद्धीमध्ये पं० शिवाप्पा खके यांचेही मार्गदर्शन लाभले. या ग्रंथाच्या संगणकीय अक्षरलेखनात सौ० उषा पसारकर यांचे फार मोठे योगदान आहे. वीरशैव मराठी साहित्य समृद्ध करण्यासाठीच शेषनारायण पसारकरांचा जन्म झाला असे म्हटले तरी अतिशयोक्ती होणार नाही. श्रीजगद्गुरू पंचाचार्यांच्या आणि श्रीकाशी विश्वनाथ-अन्नपूर्णा मातेच्या आणि जगद्गुरू विश्वाराध्यांच्या कृपाशीर्वादाने या दांपत्याला दीर्घ आयुरारोग्य लाभून भविष्यकाळात त्यांच्याकडून अशीच मूल्यवान ग्रंथरचना होवो, हा मंगलाशीर्वाद!

इत्याशिष:

# भूमिका

## ‘झाले कृतार्थ जीवन’...

लहानपणी महर्षी वाल्मीकीची कथा वाचली तेव्हाच अनुष्टुभ् हा जगातील पहिला छंद असून महर्षी वाल्मीकी त्यामुळे आदिकवी ठरले, हे समजले. क्रौंचपक्ष्यांचे मिथुन, व्याधाने मारलेला बाण, वृक्षावरून खाली कोसळलेला नर, शोकविव्हल पक्षिणी आणि महर्षी वाल्मीकींच्या मुखातून अभावितपणे प्रकट झालेली ती शापवाणी-

*मा निषाद प्रतिष्ठां त्वमगम: शाश्वती: समा:।*
*यत्क्रौंचमिथुनादेकमवधी: काममोहितम्।। ...*

हे सारे वाचल्यावर त्यावेळीही आतून पार हेलावून गेलो होतो आणि आपल्याला लिहिता येईल का या छंदात, हा विचार माझ्या बालमनाला स्पर्शून गेला होता. पुढे आयुष्य वळणावळणांनी वाहात राहिले. शिक्षण, नोकरी, संसार, लेखन, प्रसंगोपात्त अंगावर पडलेल्या जबाबदाऱ्या... इत्यादी.

परमपूज्य श्रीकाशीजगद्गुरू डॉ० चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या कृपाशीर्वादाने तर मी अंतर्बाह्य उजळून गेलो. ‘जन्म हा अखेरचा’, ‘श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत’, ‘श्रीसिद्धान्तशिखामणी अभंगगाथा’, ‘श्रीजगद्गुरू पंचाचार्य विजय’ अशा रचना त्यांनी माझ्याकडून करवून घेतल्या. काशीजंगमवाडी मठात ‘श्रीजगद्गुरू पंचाचार्य विजय’ ग्रंथाचे लेखन चालू असताना फावल्या वेळात मी पिंडस्थलावर चार-पाच श्लोक मराठी अनुष्टुभ् छंदात सहज लिहून पाहिले. गंमत म्हणून आमच्या ‘वीरशैव मराठी समाज’ या व्हाटस्‌अप समूहावर ते पोस्ट केले. योगायोग असा की, मी श्रीकाशीमहास्वामीजींच्या दर्शनासाठी गेलो त्यावेळी ते नेमकी तीच पोस्ट वाचत होते. मला पाहताच ते हर्षाने म्हणाले, “हे किती छान जमलं तुम्हाला. आम्हाला तर संस्कृत श्लोकच वाचत आहोत असं वाटलं. ‘पंचाचार्य विजय’चं लेखन संपल्यावर तुम्ही अनुष्टुभ्

छंदातच 'श्रीसिद्धान्तशिखामणी' लिहा.''

मी हसून म्हणालो, ''आपलं काम काही संपेचना. उसाच्या एका पेरातून दुसरं पेर उगवावं तसंच चाललंय. एका ग्रंथातून दुसरा ग्रंथ उगवतोय. पण हे काम फार अवघड आहे. जमेल असं वाटत नाही.''

महास्वामीजी म्हणाले, ''तुमच्यावर जगद्गुरू विश्वाराध्यांची, पंचाचार्यांची पूर्ण कृपा आहे. नक्कीच जमेल. पुढच्या वेळी हे काम करा.''

प्रत्यक्ष काशीजगद्गुरूंचीच आज्ञा ती. त्यानुसार फेब्रुवारी २०१६ ला काशीला आलो. महाशिवरात्रीनंतर ३ मार्च २०१६ रोजी, गुरुवारी सकाळी काशीविश्वनाथ, जगद्गुरू विश्वाराध्य आणि परमपूज्य श्रीकाशीमहास्वामीजी यांचे दर्शन घेऊन लेखनाला प्रारंभ केला आणि काय आश्चर्य...! बरोब्बर दोन महिन्यांनी २ मे २०१६ रोजी, सोमवारी मध्यरात्री अनुष्टुभ् छंदातील हे लेखन पूर्ण झाले. १३०१ श्लोक लिहून झाले. मी थक्क झालो. माझे काही लेखनप्रकल्प वर्षानुवर्षे रखडलेले असताना काशीला जंगमवाडी मठात बसलो की महिन्या-दोन महिन्यांत ग्रंथ हातावेगळे होतात, हा काय चमत्कार आहे? हे श्रीगुरुकृपाबळ आणि स्थानमाहात्म्य नव्हे तर आणखी काय? श्रीकाशीमहास्वामीजींच्या कृपेमुळे माझ्यासारख्या सामान्य कुवतीच्या माणसाला ग्रंथलेखनाची संधी मिळाली हे पाहून माझ्या भाग्याचा कधीकधी मलाच हेवा वाटू लागतो.

मराठी भाषेत अनुष्टुभ् रचनेची फारच थोडी उदाहरणे आहेत. सतराव्या शतकात वामन पंडितांनी अनुष्टुभ् छंदात 'गीता समश्लोकी' रचली. त्यानंतर विसाव्या शतकातील स्वातंत्र्यवीर वि० दा० सावरकर यांनी अंदमानच्या तुरुंगात भिंतीवर खरडून लिहिलेली, १९२४ मध्ये प्रकाशित झालेली 'कमला' ही कलाकृती आणि पूज्य आचार्य विनोबा भावे यांनी लिहिलेली 'गीताई' या रचना अनुष्टुभ् छंदात आहेत. अनुष्टुभ् छंदातील मराठी रचना ह्या तीनच. महाराष्ट्रकवी यशवंत यांनी 'छत्रपति शिवराय' हे महाकाव्य अनेक छंद-वृत्तांत रचले. त्यात त्यांनी काही ठिकाणी अनुष्टुभ् छंदाचाही वापर केला. पण अनुष्टुभ् छंदातील ग्रंथरचनेची मात्र वरील तीनच उदाहरणे आहेत. ज्या छंदात रचना करायला सहसा मराठी

कवी धाडस करीत नाहीत त्याच छंदात संपूर्ण ग्रंथलेखन करण्याची आज्ञा श्रीकाशीमहास्वामीजींनी मला दिली, यावरून माझ्यावर किती दडपण आले असेल याची वाचक कल्पना करू शकतील. अनुष्टुभ् छंदातील ऱ्हस्व-दीर्घांचा व अक्षरांचा क्रम सांभाळणे, 'भ'गण आणि 'न'गण या गणांपासून सावध राहणे, संस्कृत भाषेतला आशय मराठमोळ्या शब्दांत व्यक्त करणे- ही सर्व तारेवरची कसरतच होती. परंतु परमपूज्य श्रीकाशीमहास्वामीजींनी आज्ञा केली की उडी घ्यायचीच हा निश्चय पक्का होता. उडी मारल्यावर एकतर बुडून जाऊ किंवा तरून जाऊ, यांपैकी काहीतरी एक घडणारच. ही मानसिक तयारी करून मी उडी घेतली आणि आश्चर्य हे की, श्रीजगद्गुरूंच्या कृपेने तरूनच गेलो. हेच श्रीगुरुकृपेचे माहात्म्य.

आता या ग्रंथाविषयी थोडे. हा ग्रंथ म्हणजे 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चा समश्लोकी अनुवाद नव्हे, हे जाणकारांनी लक्षात घ्यावे. मूळ संस्कृत श्लोकांतील आशय जिज्ञासू मराठी वाचकांना अर्थसुलभ व्हावा आणि अनुष्टुभ् छंद वाचल्याचा त्यांना आनंदानुभव यावा, हा उद्देश या रचनेमागे आहे. पिंडस्थलापासून ज्ञानशून्यस्थलापर्यंतचा संपूर्ण श्लोकार्थ यात आलेला आहे. त्याआधीचा पूर्वपीठिका आणि त्यानंतरचा उपसंहार या भागांचा मात्र संक्षेप केलेला आहे. त्यामुळेच मूळ संस्कृत १४०५ श्लोकांचे मराठीत १३०१ श्लोक झालेले आहेत. या रचनेसाठी पूज्य विनोबाजी यांच्या 'गीताई'चा आदर्श समोर ठेवला होता.

'श्रीसिद्धान्तशिखामणी'त २१ परिच्छेद आहेत. या ग्रंथातील 'पूर्वपीठिके'त १ ते ४ परिच्छेद आणि ५व्या परिच्छेदातील 'पिंडस्थल' आरंभ होण्याआधीचे श्लोक यांचा सारांश आलेला आहे. ५व्या परिच्छेदातील ३२व्या श्लोकापासून २०व्या परिच्छेदातील ७०व्या श्लोकापर्यंत पिंडस्थलापासून ज्ञानशून्यस्थलापर्यंत १०१ स्थले आली आहेत. २०व्या परिच्छेदातील ७१व्या श्लोकापासून २१व्या परिच्छेदातील ५४व्या श्लोकापर्यंतचा सारांश 'उपसंहारा'त आलेला आहे.

'श्रीसिद्धान्तशिखामणी'ला 'रेणुकगीता' असेही म्हणतात. त्यामुळे परमपूज्य श्रीकाशीमहास्वामीजींनी या ग्रंथाला विनोबाजींच्या 'गीताई'सारखे 'रेणुकगीताई'

हे नाव सुचवले. अर्थात्‌च ते तत्काळ मान्य झाले.

जिज्ञासू वाचकांसाठी अनुष्टुभ्‌ छंदाबद्दल थोडे सांगतो.

१. या छंदात प्रत्येकी आठ अक्षरांचे चार चरण असतात. सर्व चरणांत पाचवे अक्षर लघू (ऱ्हस्व), सहावे अक्षर गुरू (दीर्घ) असते. पहिल्या व तिसऱ्या चरणांतील सातवे अक्षर गुरू आणि दुसऱ्या व चौथ्या चरणांतील सातवे अक्षर लघू असते. कोणत्याही चरणाच्या प्रारंभी 'भ'गण (उदा०- भास्कर) आणि 'न'गण (उदा०- नमन) येता कामा नये. आला तर छंदोभंग होतो. या सर्व मर्यादा सांभाळूनच निर्दोष अनुष्टुभ्‌ लिहिता येतो. हीच तारेवरची कसरत. संस्कृतमध्ये सहजपणे अनुष्टुभ्‌ लिहिता येतो याचे कारण त्या भाषेची प्रकृती. मराठीत लिहिणे अवघड जाते याचे कारण मराठी भाषेची प्रकृती.

२. संस्कृतमध्ये संधी होऊन अक्षरसंख्या कमी होते. उदा०- सूर्य + उदय = सूर्योदय. इथे पाच अक्षरांची चार अक्षरे झाली. पण मराठीत मात्र संधी होत नाही. उदा०- सूर्य + उगवला = सूर्योगवला, असा संधी होऊन सहा अक्षरांची पाच अक्षरे होत नाहीत. त्यामुळे मराठीत अनुष्टुभ्‌ लिहिताना आठ अक्षरांत आशय बसविणे आणि लघुगुरु-क्रम सांभाळणे ही अत्यंत अवघड गोष्ट होऊन बसते.

३. संस्कृतमध्ये कर्ता, कर्म, क्रियापद कुठेही एकमेकांशी जोडून संधी करता येतो. मराठीत तसे करता येत नाही. केले तर रचना अर्थजड क्वचित्‌ अर्थशून्य होऊन बसते.

४. तत्सम शब्दांत संस्कृत व मराठी यांत ऱ्हस्व-दीर्घक्रम बदलतो. उदा०- संस्कृत 'मानव:' आणि 'भसितं' या शब्दांत शेवटचे अक्षर गुरू (दीर्घ) आहे, तर याच शब्दांचे मराठीत 'मानव'चे शेवटचे अक्षर लघू (ऱ्हस्व) असून हा 'भ'गण होतो. तसेच संस्कृत 'भसितं'चे शेवटचे अक्षर गुरू आहे, तोच मराठीत 'भसित' लिहावा लागतो. शेवटचे अक्षर लघू होऊन तो 'न'गण होतो.

ही सर्व बंधने सांभाळत अनुष्टुभ्‌ छंद लिहावा लागतो, त्यामुळे मराठी कवी या छंदाच्या वाटेला सहसा जात नाहीत. वामन पंडित, स्वातंत्र्यवीर सावरकर,

आचार्य विनोबा भावे हे तिघेही थोर संस्कृतज्ञ, तत्त्वज्ञ व भाषाप्रभू होते. त्यांनी समर्थपणे हा छंदप्रकार हाताळला. माझ्यासाठी मात्र हे अत्यंत अवघड असे काम होते. परंतु आश्चर्य असे की, त्या थोर कवींच्या समोर उभे राहण्याचीही योग्यता नसलेल्या माझ्यासारख्या सामान्य माणसाकडून श्रीकाशीजगद्गुरूंनी ही अनुष्टुभ् छंदोरचना करवून घेतली. यावरून परमपूज्य श्रीकाशीमहास्वामीजींचा संकल्प आणि आशीर्वाद किती प्रभावशाली आहे, याची कल्पना येईल. यामुळेच मी कृतार्थता अनुभवत आहे.

बेंगळुरू विद्यापीठाचे निवृत्त संस्कृत विभागप्रमुख व अनेक इंग्रजी, संस्कृत, कन्नड ग्रंथांचे लेखक डॉ० एम० शिवकुमारस्वामी यांना श्रीमहास्वामीजींच्या आज्ञेवरून काही श्लोक वाचून दाखवले. त्यांना मराठी कळत नसली तरी 'हा निर्दोष अनुष्टुभ् छंद आहे' असा अभिप्राय त्यांनी दिला. हे या रचनेवरचे शिक्कामोर्तब.

आमचे परममित्र आदरणीय पं० शिवाप्पा खके यांच्या अकृत्रिम स्नेहवर्षावात मी सदैव भिजून चिंब झालो आहे. ते संस्कृतज्ञ तर आहेतच, शिवाय संस्कृतमध्ये अनुष्टुभ् रचनाही करतात. त्यांनी प्रत्येक श्लोक वाचून त्यातील विषय आणि रचना साक्षेपाने न्याहाळली. त्यांच्या तज्ज्ञ, अनुभवी दृष्टीखालून हे लेखन गेले आहे. या शिवाय या ग्रंथावर आठ मराठी अनुष्टुभ् श्लोक रचून त्यांनी आपला अभिप्रायदेखील व्यक्त केला. त्यांच्या ऋणातून मुक्त होता येणे शक्य नाही.

श्री० काशीनाथ सर्जे, सोलापूर यांनीही मुद्रणाआधी हा संपूर्ण ग्रंथ नजरेखालून घातला व छंददृष्ट्या निर्दोष असल्याचा अभिप्राय दिला. त्यांचे आभार.

त्यानंतर श्रीकाशीमहास्वामीजींसमोर या ग्रंथाचे समग्र वाचन झाले. त्यांच्या अंतिम आदेशानुसार आता हा ग्रंथ माझ्या मराठी वीरशैव बांधवांसमोर ठेवत आहे.

ग्रंथसिद्धीसाठी अनेकांचे सहकार्य लाभले. जंगमवाडी मठाच्या मुख्य प्रबंधिका श्रीमती नलिनी चिरमे वहिनी यांनी मठातील वास्तव्यात आमची सर्वतोपरी काळजी घेतली. मठाचे व्यवस्थापक श्री० पंचाक्षरी लिगाडे आणि प्रवीण स्वामी,

माधव स्वामी, मंजुनाथ पाटील यांचेही सहकार्य लाभले. ष०ब्र० महादेव शिवाचार्य स्वामीजी, कळमनुरी व अभिजित पसारकर यांनी ग्रंथाची मुद्रिते पं० खके गुरुर्जींपर्यंत पोहोचवली. शैवभारती शोधप्रतिष्ठानचे कार्यवाह डॉ० जी० सी० केंदडमठ यांचेही सहकार्य मिळाले. माझी पत्नी सौ० उषा पसारकर हिने निर्दोष अक्षरलेखन केले. आमचे मित्र, जयंती प्रिंटर्स, सोलापूरचे संचालक श्री० बाबूराव मैंदर्गीकर आणि त्यांचे सहकारी यांनी उत्तम मुद्रण करून दिले. या सर्वांविषयी कृतज्ञता.

प०पू० श्रीकाशीजगद्गुरूंविषयी काय लिहावे? शब्द अपुरे पडतात. अशा ज्ञाननिष्ठ, सत्त्वशील जगद्गुरूंचा कृपाशीर्वाद आणि सान्निध्य लाभण्यासाठी किती जन्मांची पुण्याई लागली असेल, कुणास ठाऊक! पण आमच्या भाग्यानेच त्यांच्या कृपास्नेहाला पात्र ठरलो आणि त्यांच्या सान्निध्याने जन्मसार्थक झाले. त्यांच्या कृपाशीर्वादाने 'झाले कृतार्थ जीवन...' एवढेच मी म्हणू शकतो.

म्हणून ही कृती त्यांच्याच पदकमली समर्पित करीत आहे.

'उषास्वप्न'
१२६ ब, मार्कंडेय नगर, सोलापूर ४१३००३
१९ जुलै २०१६ (गुरुपौर्णिमा)

**शे० दे० पसारकर**
चरभाष **09420780570**

# विषयानुक्रमणिका

# समर्पण



ज्ञानवैराग्यसंपन्न ज्ञानपीठी विराजित
शिवसिद्धान्तविज्ञाते आचार्य चंद्रशेखर

सत्त्वशील कृपामूर्ती विवेकी शुद्धमानस
अमृतात भिजे वाणी अंतरी करुणाजल

विख्यात वीरशैवांचे मुक्तिदाते जगद्गुरू
अर्पिले पादपद्मी हे वाक्पुष्प भक्तिपूर्वक

-शेषनारायण

# रेणुकगीताई

छंद : अनुष्टुभ्

अगस्त्य मुनिवर्यास बोधिली रेणुकेश्वरे
तेणे रेणुकगीताई नाव सार्थचि हे ठरे

दुःखाने पोळतो जेव्हा आसवे लागती झरू
माऊलीचा मृदू हात लागे पाठीवरी फिरू

शेषाची वीरशैवांची सर्वांची माय ही खरी
हिच्या श्लोककुशीमध्ये विसावूनि पहा तरी...

# मंगलाचरण

सच्चिदानंदरूपाने जीवसृष्टीत नांदतो
शिवब्रह्मास साष्टांग वंदितो मी पुनःपुन्हा १

वीरशैव जगी धर्म ज्यांनी महान स्थापिला
पंचाक्षरस्वरूपी त्या पंचाचार्यांस वंदितो २

श्रेष्ठ काशीपुरीमध्ये ज्ञानसिंहासनावरी
शोभले दिव्य आचार्य चंद्रशेखर वंदिले ३

पलसिद्ध कृपामूर्ती आद्यगुरूंस वंदन
श्रीगुरू सिद्धलिंगांची सदैव नमितो पदे ४

शिवभक्त शिवाचार्य संत ते शरणादिक
नम्र त्यांच्या पदांवरी जाहला शेष आदरे ५

# पूर्वपीठिका

## शिवस्तुती

त्रैलोक्यसंपदाचित्र रेखाववयास भिंत जो
सच्चिदानंदरूपी त्या शिवब्रह्मास वंदितो १

वेदान्ती बोलती ब्रह्म शास्त्राचे प्रतिपाद्य जे
जगताचे असे मूळ परमेशास त्या नमू २

फेस-लाटांपरी जेथे तत्त्वे छत्तीस भासती
वंदितो शिव नावाच्या चित्सागरास निर्मल ३

प्रकाशे विश्व तेजाने ज्याचिया तोषते सुखे
नमितो तो परात्मा जो ऐश्वर्ययुक्त निर्गुण ४

सदाशिवासवे सर्व तत्त्वे करी प्रकाशित
वंदितो शांत शंभूस ज्याचा स्वभाव निर्मल ५

स्व-इच्छेने धरी देह स्व-इच्छेनेच वर्ततो
निर्मी जो विश्व स्वेच्छेने सांब शंभूस त्या नमू ६

सहज श्रेष्ठ ईशत्व वसे पावे जिथे लय
शूलधारी महेशा त्या महादेवास वंदितो ७

## शक्तिस्तुती

विद्वान सर्व लोकांचे मानिती मूलकारण
नमितो ती पराशक्ती शिवाची धर्मचारिणी ८

नामरूपे नटे शंभू महादेव जिच्यामुळे
मायारूपे विराजे त्या पराशक्तीस वंदन ९

जन्मे शिवातुनी आद्य शान्त्यतीतोत्तरा कला
तीहून श्रेष्ठ जी माता नमू शक्तीस मंगला ॥ १०

इच्छाज्ञानादि रूपाने प्रकाशे जगतास जी
झरा चित्सुखबोधाचा त्या चिच्छक्तीस वंदितो ॥ ११

अमृतत्व हवे ज्यांस सुविद्या त्यांस देतसे
रमवी शिवचित्तास नमितो ती अहर्निश ॥ १२

## ग्रंथकार-वंशवर्णन

आचारशील संपन्न महायोग्यांत अग्रणी
शिवयोगी जगी ख्यात शिवविज्ञानसागर ॥ १३

चंद्रिकेसमान वाणीने उधाणे भक्तिसागर
श्रवणे सु-मने होती पद्मासम प्रफुल्लित ॥ १४

उत्पन्नले तया वंशी मोत्यासमान निर्मल
शिवयोग्यांत जे श्रेष्ठ आचार्य मुद्ददेव ते ॥ १५

शरणागत जीवांस ज्ञान बोधूनि तोषिती
जाहले त्यामुळे ख्यात नामाने मुद्ददेव ते ॥ १६

शिवसिद्धान्तनिर्णेता पवित्र शिवरूप जो
सिद्धनाथ जहाला तो त्यांना प्रशांत नंदन ॥ १७

वीरशैवशिखारत्न श्रेष्ठ आचारमंडित
प्रशंसिती तया सर्व शिवज्ञानसमुद्रचि ॥ १८

आचार जन्मले जेथे कुळी त्या जन्मल्यामुळे
सुस्थिर दृढ निर्दोष शिवभक्ती मनी वसे ॥ १९

शिवाचार्यशिखारत्न सिद्धनाथांस नंदन
शिवयोगी जहाला तो जैसा सिंधूस चंद्रचि ॥ २०

चिदानंद पराकाश शिवाशी ऐक्य पावला
शिवयोगी ठरे नाम अन्वर्थकचि त्यामुळे ॥ २१

पक्व झाले शिवज्ञान त्याचा सुवास दर्वळे
कीर्तिपुष्पसुगंधाने गंधाळल्या दिशा दहा ॥ २२

खंडूनि प्रतिसिद्धान्त शिवभक्तीस रक्षिले
जसा नाशूनि अंधार प्रकाशे विश्व भास्कर ॥ २३

प्रभेने शोभतो चंद्र तसे ज्ञानप्रभेमुळे
शोभले शिवयोगी ते धर्ममार्गप्रवर्तक ॥ २४

कामिकापासुनी तंत्रे वातुलासह शैव ती
पुराणे शैवही तैसी पाहूनि परमादरे ॥ २५

न रोधी वेदमार्गास आचार सिद्ध व्हावया
कुमार्गास निवाराया कराया तुष्ट सज्जना ॥ २६

सर्वस्व वीरशैवांचे सर्वार्थ जे प्रकाशक
अस्पर्श सर्व दोषांस प्रिय जे सज्जनांप्रती ॥ २७

सर्वत्र आगमी आणि पुराणी प्रतिपादिला
शिवे देवीस तैसाचि कथिला स्वसुताप्रती ॥ २८

संप्रदायात प्रख्यात महात्मा रेणुकेश्वर
गणेश्वरे अगस्त्यास पुनश्च बोधिले जगी ॥ २९

वीरशैव महातंत्र स्थले शतैक ज्यामधे
कथिला लोककल्याणासाठी प्रज्ञावरे पुन्हा ॥ ३०

तंत्रांत कथिला अंती नसे काहीच त्यापुढे
तेणेचि ख्यात सिद्धान्तशिखामणी जगामधे ॥ ३१

वीरशैवरहस्यार्थ पूर्णत्वे प्रतिबिंबला
शिवाद्वैतप्रसादाने युक्त ज्ञानी-प्रशंसित ॥ ३२

पाशुपतमताचे ते सार ज्याच्यात साठले
तो हा सिद्धान्त सर्वांनी पाहावा परमादरे ३३

## सृष्टिनिर्मिती

निर्विकल्प निराकार सच्चिदानंदलक्षण
होते केवल ते ब्रह्म सृष्टिआधी अवस्थित ३४

स्वयंप्रकाश सर्वज्ञ शांत सामर्थ्यवान ते
परिच्छेदाविना पूर्ण सर्वव्यापी निरंकुश ३५

शिव रुद्र महादेव पदांनी त्यास बोलिती
अद्वितीय अनिर्देश्य परब्रह्म सनातन ३६

विलीन परब्रह्मात होते पूर्ण चराचर
ब्रह्मतेजेचि संपूर्ण विश्व होई प्रकाशित ३७

करावे विश्व निर्माण असा संकल्प जागता
किंचित् स्फूर्तिमयी रूप करी ते ब्रह्म धारण ३८

अविनाभावरूपाने वसे शक्ती शिवात जी
निर्मितीस स्वये उपादानकारण जाहली ३९

निर्माता सर्व जीवांचा शंभू तो विश्वनायक
कराया विश्वनिर्माण निर्मिला ब्रह्मदेव तो ४०

विद्या सानुग्रहे त्याला सर्वचि उपदेशिल्या
जाहला जगनिर्माणा उद्युक्त ब्रह्मदेव तो ४१

मायेने झाकिला तेणे होईना विश्वनिर्मिती
केले प्रयास कित्येक उपाय सापडेचिना ४२

शंकरा प्रार्थिले त्याने होऊनि अति व्याकुळ
म्हणे देवा महादेवा वंदितो आपुली पदे ४३

सांगा उपाय विश्वाच्या निर्मितीचा मला अता
सृष्टी करा तुम्ही आधी मग निर्मीन मी तशी ४४

प्रार्थना ब्रह्मदेवाची ऐकूनि विश्वनायके
विश्वनिर्मितिसंहारक्षम गणांस निर्मिले ४५

शिवपंचगणांमध्ये मुख्य रेणुक दारुक
अत्यंत प्रिय शंभूला महासामर्थ्यवान ते ४६

सर्वविद्याविशेषज्ञ सर्व कार्यांत तत्पर
त्रिमलांतूनि ते मुक्त महात्मे अति उज्ज्वल ४७

आत्मानंदरसास्वादी दोघे तल्लीन सर्वदा
शिवतत्त्वमहाज्ञानी विमुक्त भवपाश ते ४८

स्थापाया शिवसिद्धान्त समर्थ आणि तत्पर
वेदान्तसारज्ञाते ते बोधायास प्रवीणही ४९

निर्वैर नित्य ते सिद्ध निरंकुश पराक्रमी
शिवाने पाहिले दोघा भाग्यवंतांस प्रेमळ ५०

समर्थ आणि विश्वासू दोघांस जाणुनी शिवे
दिधले द्वारपालाचे कार्य अंत:पुरातचि ५१

## कैलासवर्णन

कैलास शोभला रम्य शिलांनी रौप्य साजिरा
जणू गंधर्वस्त्रियांचा क्रीडा-मौक्तिकदर्पण ५२

फुलले आम्र मंदार अशोकादी तरू तिथे
मरंदसेवनी दंग होऊनि भृंग डोलती ५३

सुगंधी पुष्परागांनी दिशा गंधित जाहल्या
कोकीळ-पंचमालापे निनादे नील अंबर ५४

किन्नरी गोड गीतांनी घुमली गिरिकंदरे
गूढ गुहांत ध्यानस्थ सानंदादी मुनीश्वर ५५

कळ्यांनी स्वर्णपद्मांच्या झाले गंधित मानस
उत्तुंग शिखरे स्वर्णस्तंभासमान भासती ५६

माणिक्य-रत्नदीपांनी अंत:पुर प्रकाशले
दारी तोरणस्तंभी त्या शंख पद्म विराजले ५७

सजले भव्य वस्त्राने विशाल छत तेथले
त्यावरी जडले मोती नक्षत्रांसम शोभती ५८

वैडूर्ये जडले भिंतीवरी तेजाळ साजिरे
नूपुरांचा ध्वनी मंद प्रमथांच्या तिथे घुमे ५९

## श्रीशंकरवर्णन

रत्नसिंहासनी दिव्य बैसले परमेश्वर
देवांच्या मुकुटांतील मंदारगंध दर्वळे ६०

शोभती सर्व देवांच्या मध्यस्थानी महेश्वर
उपनिषत्वनामध्ये विहरे हंस तो जणू ६१

आली भवविषे मूर्च्छा त्यांना संजीवनीच तो
आत्मानंदरसास्वादी तल्लीन भ्रमरासम ६२

ब्रह्मांडरूप पात्रांना कौशल्ये घडवीतसे
सर्व देवसमूहात चक्रवर्तीच शोभतो ६३

सहस्र चंद्रबिंबांची प्रकटावी जशी द्युती
कांतिमान तसा देह कर्णी पुष्पकळी रुळे ६४

गुंफिली मुक्तमाळेत शोभते मुंडमाळ ती
तुळेना चंद्रकांती ती तेजाशी मुखमंडली ६५

उत्फुल्ल कमळे तैसे त्रिनेत्रही प्रफुल्लित
देखणे मंदस्मिताने ओष्ठही पर्णकोमल ६६

रुळती मकराकार कपोली कर्णकुंडले
कंठही जाहला नील कालकूट विषामुळे ६७

रत्नकंकण तैसेचि बाजुबंद-प्रभेमुळे
शोभल्या कल्पवृक्षाच्या शाखा चतुर्भुजा जणू ६८

नाभीपर्यंत मोत्यांची ओघळे माळ गोजिरी
जणू जटेतली गंगा आलिंगिते महेश्वरा ६९

मणिनिर्मित चौरंगी रत्ननूपुर-वेष्टित
बैसले देव ठेवूनि त्यावरी पद कोवळे ७०

## पार्वती वर्णन

शोभली वामभागी ती प्रिय वेषात पार्वती
विश्वजन्मास जी मूळ सर्वकारण मंगला ७१

इच्छा-ज्ञान-क्रियारूप बहुशक्तिविलासिनी
शिवाशी युक्त राहूनि आत्मतत्त्व प्रकाशिते ७२

संसारविषकांतार दावाग्नीसम जाळिते
वेणीतल्या फुलांमध्ये गुंजती भृंग देखणे ७३

सौंदर्य पूर्णचंद्राचे डोलते मुखमंडली
लावण्य पेरिते मंद हास्यात नथ देखणी ७४

डोलती नीलरत्नांची देखणी कर्णभूषणे
नीलदीप्ती पडे त्यांची पार्वती-लोचनांवरी ७५

कर्णमंचावरी नेत्रकटाक्ष वळती तिचे
जणू नीलप्रभेमुळे नीलोत्पलेचि डोलती ७६

भ्रूविलास तिचे जैसे मदनाचे धनुष्यचि
जास्वंदीचे जणू फूल मधाळ लाल ओठ ते ७७

नादमाधुर्य शंखास मदनाच्याहि जिंकिते
मृदू कोमल बाहूही आणिती कमला उणे ७८

चिरयौवन लावण्ये शृंगारिले शरीरही
नाजूक वेल पद्माची तशी ती शोभली कटी ७९

कुसुंबी फूलरंगाचे वस्त्र ते परिधानले
आम्रपर्णचि तांबूस कोवळे पदही तसे ८०

कंठात मुक्तमाला नि पायांत नादपैंजणे
बाजुबंद दंडांमध्ये सर्वालंकारमंडित ८१

नेत्रांस सुखवी पूर्ण देखणी देहवल्लरी
शोभली पार्वती माता कुलविद्यास्वरूपिणी ८२

## शिवसभा

जिचे कुटुंब संपूर्ण त्रैलोक्य त्या उमेसह
रम्य सिंहासनी शंभू बैसले अति देखणे ८३

श्वेतछत्र महालक्ष्मी धरूनि मागुती उभी
गाई सरस्वती गीत वीणा झंकारुनी मृदू ८४

स्त्रिया उपनिषद्रूपी ॐकार-विंझणे करी
घेऊनि घालिती वारा कंकणे करिती ध्वनी ८५

झंकारीत करी रत्नकंकणे अति गोड ती
ढाळिती देवकन्याही चवऱ्या उभयांवरी ८६

भ्रमताना जसे हंस दिसे मधूनि पद्म ते
चवऱ्यांतूनि तैसे ते शिवाचे मुखमंडल ८७

अष्टविद्येश्वरादी नि नंदीचंडादि ते गण
अर्चिती शिवशंभूस भक्ती धरूनि मानसी ८८

देव दानव ते सिद्ध गंधर्व यक्ष किन्नर
आदित्य-वसु-रुद्रादी वसिष्ठादी मुनीश्वर ८९

व्यास नारद सानंद पराशर मरीचि ते
सर्वही भक्तिभावाने अर्चिती शिवशंकरा ९०

बिंबले सर्व देहांत शंभूचे रूप निर्मल
सर्वांतरी वसे मीच जणू दाखवितो शिव ९१

स्वेच्छावर्तन शंभूचे चालले तेथ सारखे
सांगती कार्य कोणास गंधर्वगान ऐकिती ९२

कधी संवाद देवांशी पाहती नृत्यही तसे
गौरविती कधी व्यासा गौरीचे मुख पाहती ९३

भृंगीच्या हास्यनृत्यास विलोकिती अधे मधे
नंदीस सांगुनी काही पाचारिती जनांप्रती ९४

काहीस नेत्रसंकेते धाडिती दूर तत्क्षणी
काहीस शासिती ऐसा राजव्यापार चालिला ९५

त्रैलोक्याधिपती शंभू सर्वसामर्थ्यवान तो
शिवाज्ञा शिरसावंद्य मानिती सर्वही तिथे ९६

चिरतारुण्य अंगात तेणे शरीर गंधित
आत्मशक्त्यामृतास्वादे सदा संतुष्ट मानस ९७

निष्कलंक करी दिव्य रूपे शंकर धारण
सज्जनांचे अरी त्यांचे जिरवी तो भुजाबळ ९८

पुरवी शरण आलेल्या भक्तांचेही मनोरथ
चिंतामणी जणू रत्न शोभले शिवशंकर ९९

शिवपंचगणांमध्ये गणनायक रेणुक
शिवे प्रसाद-तांबूल द्याया पाचारिले तया ॥ १०० ॥

आनंदूनि निघाला तो शंकराकडे त्याक्षणी
शिवासमीप तो आला लंघूनि दारुका त्वरे ॥ १०१ ॥

रुचले ना शिवाला हे मार्गी गणास लंघिले
दावाया भक्तमाहात्म्य त्यास शंकर बोलिले ॥ १०२ ॥

**श्रीशंकर म्हणाले**

अरे रेणुक दुर्बुद्धे दृढ तो भक्त दारुक
त्यास ओलांडिले कैसे सभेत आज माझिया ॥ १०३ ॥

मम भक्तांस लंघूनि जो कोणी अवमानितो
आयुष्य संपदा त्याची कीर्ति-कूळहि नाशते ॥ १०४ ॥

यमाने एकदा मार्कंडेयास अवमानिता
पदाघाते जहाला तो नामशेषचि माझिया ॥ १०५ ॥

शंकुकर्ण-भृगूलाही विष्णूने छळिले अती
तेणे त्यास दहा जन्म घ्यावे भूवर लागले ॥ १०६ ॥

दधीचीशी रणी जेव्हा झुंजला विष्णु एकदा
त्याचे चक्रचि भंगूनि पराभूतचि जाहला ॥ १०७ ॥

दक्षाने शिवगणांसी जेधवा अपमानिले
शिरोविहीन होऊनि जाहला मेषवक्त्र तो ॥ १०८ ॥

भक्त श्वेतास यमाने दुर्लक्षिताच कोपलो
क्रोधाग्नीत तया केले भस्मसातचि पूर्ण मी ॥ १०९ ॥

लंघिले भक्त ज्यांनी ते हारले मृत्यु पावले
तेणे भक्तास कोणीही अवमानू नये कधी ॥ ११० ॥

लंघिले अविचाराने दारुका अपमानिले
भूलोकी जन्म घे आता कराया कर्मक्षालन ॥ १११

रेणुक म्हणाले

ऐकूनि प्रार्थना घ्यावी माझी हे परमेश्वरा
असे मनुष्ययोनी ती दु:खखाणचि केवळ ॥ ११२

जाति-आयुष्य-भोगांत वैषम्य पेरिले तिथे
अशीच घडती कर्मे ईश्वरा भूतलावरी ॥ ११३

त्रिताप सोसणे लागे भजावे देवतांतरा
दावे वर्णाश्रमांचेही पडे कंठात भूवरी ॥ ११४

दैन्याची जन्मभूमी ती पडे दु:खचि भोगणे
त्यागूनि तुमची सेवा राहू भूवर मी कसा ॥ ११५

नको मनुष्ययोनी ती मृत्युलोकात राहणे
कृपाछत्र असो द्यावे माझ्यावरी कृपानिधे ॥ ११६

श्रीशंकर म्हणाले

मद्भक्तांस कशी भीती रेणुका गणनायका
नको मनुष्ययोनीचे गाऱ्हाणे सांगणे मज ॥ ११७

तेलंग शुभ देशात शैलाच्या उत्तरेकडे
कोलनुपाक नावाचे असे विशाल गाव ते ॥ ११८

सोमेश्वर अशा नावे नांदतो जाण मी तिथे
त्याच लिंगातुनी होई प्रादुर्भूत धरेवरी ॥ ११९

रेणुका मम आज्ञेने पवित्र वीरशैव तो
स्थापी भूमीवरी धर्म वेदवेदान्तसंमत ॥ १२०

माझा आणिक भक्तांचा करी ख्यात प्रतापही
लोका वळण लावी तू वेदमार्गानुसारचि ॥ १२१

बोलूनि आसनाहूनि उठले शिवशंकर
भ्रूसंकेते समस्तांस जावया ते खुणाविती १२२
गेले अंत:पुरामध्ये उमा आणि गणांसह
जावया भूवरी सिद्ध जाहले रेणुकेश्वर १२३

## रेणुकावतरण

भव्य तेलंग देशात कोल्लिपाकी पुरी तिथे
सोमेश्वर महालिंगा भक्तीने भक्त अर्चिती १२४
प्रादुर्भूत तिथे झाले लिंगातूनि गणेश्वर
तेज:पुंज पहाता ते जाहले लोक विस्मित १२५
त्रिपुंड्र भस्म सर्वांगी रुद्राक्षे देह मंडित
जटामुकुटधारी ते विराजे लिंग मस्तकी १२६
कंथा कटीस तेणे ते शोभले रूप साजिरे
करी कमंडलू आणि अश्वत्थ दंड शोभला १२७
शिवानंदपरिज्ञाने मनी आनंद दाटला
संसारवासनादोष-पिंजरा भंगला तसा १२८
शिवागमसमुद्राच्या चंद्र ते भरतीस्तव
स्मरती गूढ चित्तात शिवाचे पदपंकज १२९
तज्ज्ञ अष्टांगयोगात सर्वकर्मस्वतंत्र ते
सिद्धवंशसमूहात होते शिखामणी जणू १३०
शिवसिद्धान्त स्थापाया जाहले कटिबद्धही
नाशिती सर्व लोकांची दृष्टिक्षेपात पातके १३१
पाहता वंदिले भक्ते आश्चर्ये राउळी तिथे
कोण आपण योगींद्रा विचारिले मृदू स्वरे १३२

श्रीरेणुक म्हणाले

शिवानंदात मी मग्न शिवासमीप राहतो
शिवाचा गण मी ख्यात नामे रेणुक जाणती ।। १३३

कार्यसिद्धी करावया आलो लिंगातुनी इथे
सिद्धवंशातला मुख्य गण रेणुक मी असे ।। १३४

रक्षाया शिवसिद्धान्त स्वच्छंदे भ्रमतो जगी
दर्शने नास्तिकादींची करावयास खंडित ।। १३५

पाहती लोक भक्तीने भरूनि लोचने तया
तत्क्षणी जाहले गुप्त पातले मलयाचली ।। १३६

## मलयाचल वर्णन

गेला चंदनगंधाने कोंदूनि मलयाचल
मंजूळ नागस्त्रियांच्या गायने घुमल्या दऱ्या ।। १३७

सुगंध वेलदोड्यांचा वाळ्याचा भरला तिथे
मल्लिका-मंजिरी-जाई-गंधांनी कोंदल्या दिशा ।। १३८

सर्व ऋतूंतल्या पुष्पे अगस्त्याश्रम शोभला
पाहिला रेणुकांनी तो तोषले अति मानसी ।। १३९

मंदारचंदनादी ते नभासी वृक्ष भेदिती
जणू कळ्याच नक्षत्रे भासती वृक्षमस्तकी ।। १४०

घालिती जल वृक्षांस कलशांतूनि निर्मल
मुनिकन्याहि प्रेमाने वर्धती वृक्षवल्लरी ।। १४१

आळ्यातील जले तृप्त हरिणीवृंद होउनी
पाडसांसह कांतारी उधळे स्वैर बागडे ।। १४२

पुष्पांच्या मकरंदाने गंधाळली सरोवरे
हंसध्वनीमुळे गोड आसमंत मधाळला १४३

प्रभेने कोंदल्या नील दिशाही काननातल्या
लोपामुद्रापदे धन्य तडागतट जाहले १४४

मुक्तमालाच कर्पूर शिवाचे मंदस्मित की
तशा तडागीच्या शुभ्र जली न्हाती मुनीश्वर १४५

नांदती तेथ प्राणीही त्यागूनि वैरभावना
आश्रमा पाहता वाटे जणू हा ब्रह्मलोकचि १४६

चर्चूनि भस्म सर्वांगी मुनी अगस्त्य बैसले
धरिले छत्र वृक्षाने चंदनाच्या शिरावरी १४७

भाळी त्रिपुंड्र कंठात रुद्राक्षमाळही रुळे
विद्युल्लता नभातील तेजःपुंज तसे मुनी १४८

त्रिधारा जणु गंगेच्या हिमाद्रीहूनि वाहती
तसे त्रिपुंड्र भाळीचे मुनीच्या शोभले दिसे १४९

अष्टसिद्धी वशीभूत निमाली ती अहंकृती
आरूढ शिवज्ञानात मोक्षाचे कल्पवृक्ष ते १५०

बैसले ऋषिमेळ्यात जणू शंकर शोभले
मानिती तुच्छ संसार ध्याती शिवास सर्वदा १५१

क्षणैक वळली दृष्टी पाहिले गणनायका
जाणिले ज्ञानचक्षूंनी रेणुकांस क्षणामधे १५२

आदरे वंदुनी उच्चासनी बैसविले तसे
पद प्रक्षाळिले लोपामुद्रेने भक्तिपूर्वक १५३

शास्त्रोक्त पूजुनी त्यांना बैसले आदरे पुढे
रेणुकाचार्य गंभीर स्वरे तयांस बोलिले १५४

### श्रीरेणुकाचार्य म्हणाले

अगस्त्या तू महाज्ञानी निर्विघ्न वर्तसी सुखे
नित्यनैमित्तिकादी ते आहे का क्षेम सर्वही १५५

गर्व विंध्याचलाचा तू नाशिलास तपोबळे
नहुषा शापिले तूचि जाहला सर्परूप तो १५६

समुद्र प्राशिला एका घोटात पूर्ण तू स्वये
जठराग्नीत वातापि केला तू भस्मसातचि १५७

तुझ्यासमान विश्वात लीलाधारी नसे कुणी
सर्वसंगपरित्यागी वाखाणिती तुला जगी १५८

पार्वतीपुत्र स्कंदास शिवे पूर्वीच बोधिले
शिवशास्त्र तुला तेचि स्कंदाने उपदेशिले १५९

घालवी संसारभीती शिवभक्ती सनातन
तुझ्यामुळेचि विख्यात अगस्त्या जाहली जगी १६०

### अगस्त्य म्हणाले

येऊनि आश्रमी माझ्या दिले आम्हांस दर्शन
सौभाग्ये ठरलो मीच श्रेष्ठ ऋषींत सर्वही १६१

तपश्चर्या फळे माझी झाले ज्ञानहि सुस्थिर
झालो श्रेष्ठ मुनींमध्ये आचार्या तव दर्शने १६२

भवसर्पविषाने जे जाहले जन मूर्च्छित
ठरे संजीवनी त्यांना कृपाकटाक्ष केवळ १६३

त्रितापांच्या-महाग्नीत जगी जे जीव पोळले
पादांबुसेवने त्यांचा दाहचि शांत होतसे १६४

शिवास प्रिय अत्यंत प्रमथा रेणुकेश्वरा
कृपा करावया माझ्यावरी आलात भूवरी १६५

उद्ध्वस्त जन्ममृत्यूचे जाहले चक्र आपुले
सिद्ध योगीश्वरा आला उद्धराया जना इथे १६६

नास्तिकांचा नसे स्पर्श असे जे श्रुतिसंमत
सर्वार्थ साधिती ज्याने पूर्ण होती मनोरथ १६७

बोधितो शिवजीवैक्य-ज्ञान सिद्धान्त पूर्ण जो
पूर्णत्वे उपदेशावा मजला तो गणेश्वरा १६८

लोककल्याण साधेल संदेहमुक्त जो करी
बोधूनि शिवसिद्धान्त करावे धन्य जीवन १६९

## तत्त्वोपदेश

अगस्त्यबोल ऐकूनि श्रीरेणुके उमेसह
क्षणैक ध्यान शंभूचे करूनि बोलिले पुढे १७०

### श्रीरेणुकाचार्य म्हणाले

अगस्त्या तू मुनिश्रेष्ठ सर्वागमांत पंडित
प्रकाशिते शिवाद्वैत ज्ञान ते ऐक सादर १७१

ऋषींनी रुचिभेदाने भिन्नार्थप्रतिपादक
सांगती भिन्न आचार असे सिद्धान्त बोधिले १७२

सांख्य-पाशुपतादी ती योग-वैष्णव सर्वही
मानिती वेदप्रामाण्य तेणे खंडू नये कधी १७३

शास्त्रे सांख्यादि वेदांच्या अंशभागास मानिती
प्रमाण शैवशास्त्राने मानिले वेद सर्वही १७४

वेदप्रामाण्य संपूर्ण शैवशास्त्रचि मानिते
तेणे वेदांप्रमाणेच प्रमाणभूत ते असे १७५

शिवाने बोधिले सर्वा अनेकानेक आगम
शैव सोम तसे पाशुपत लाकुल मुख्य हे १७६

वाम दक्षिण सिद्धान्त मिश्र शैवागमांत हे
भेद त्यांच्यात सिद्धान्त-आगम वेदसंमत १७७

वेदांत शैवसिद्धान्ती एकार्थ प्रतिपादिले
विद्वान मानिती दोन्ही प्रमाण समरूपचि १७८

कामिकागम आदी त्या अठ्ठावीस शिवागमी
उत्तरी बोधिला वीरशैव-सिद्धान्त जाण तो १७९

शिवस्वरूप विद्येत विशेषे रमती जन
वीरशैव अशा नामे ज्ञाते त्यांनाच बोलिती १८०

वीचा अर्थ असे विद्या शिवजीवैक्य बोधिते
रत तिच्यामधे झाले जाणावे वीरशैव ते १८१

संसारा मानिती श्वान त्यागिती त्यास निश्चये
शिवविद्येमधे वीरमाहेश्वर सदा रत १८२

बोधिते शिवजीवैक्य विद्या तिलाच बोलिती
विद्येत रमती त्यांना वीर नामे प्रशंसिती १८३

पूजा आंतर ती जाण करिती वीरशैव ते
वीरमाहेश्वर बाह्य पूजेत रमती तसे १८४

ज्ञानयज्ञात निमग्न सदैव वीरशैवचि
कर्मयज्ञात ते वीरमाहेश्वरचि मग्न ते १८५

आचार-स्थलभेदांनी लिंगार्चनादि यांमुळे
सांगती वीरशैवांचे सहा प्रकार पंडित १८६

शास्त्रात वीरशैवांच्या सहा प्रकारची स्थले
अधिकारी नि धर्माच्या भेदांमुळेचि जाहली   १८७

सांगती भक्त प्रारंभी माहेश्वर दुजे स्थल
प्रसादी तिसरे आणि चवथे प्राणलिंगि ते   १८८

पुढे शरण जाणावे ऐक्य अंतिम ते असे
हेच षट्स्थल आता मी निरोपीन घटोद्भवा   १८९

सर्वेंद्रिये करी एक कर्णांत प्राण ओतुनी
शास्त्र हे वीरशैवांचे अगस्त्या ऐक सादर   १९०



# अंगस्थलांतर्गत भक्तस्थल

## १. पिंडस्थल

पुण्य केले बहू जन्मी क्षीणला पापपिंजरा
शुद्धान्त:करणाचा जो जीव तो पिंड बोलिला ॥ १९१

शिव-शक्तीतुनी जन्मलेल्या विश्वी विशेष तो
सरे पुण्यबळे पाप शुद्धात्मा पिंड जाण तो ॥ १९२

शिव एकला साक्षात सच्चिदानंद व्यापक
विकल्प-गुण-आकार-प्रपंचातूनि मुक्त तो ॥ १९३

अनादी अविद्येसंगे तयाचा अंश जीव तो
देवपक्षिमनुष्यादी भिन्न योनींत जन्मतो ॥ १९४

महेश अंतरी त्याच्या वसे होऊनि प्रेरक
चंद्रकांती जसे पाणी अग्नी सूर्यमण्यातही ॥ १९५

जसा अंकुर बीजात तसा जीवांत शंभुही
जीव-ईश्वरस्वरूप एका ब्रह्मात कल्पिले ॥ १९६

सूर्याठायी जसे बिंब कल्पिती प्रतिबिंब ते
तसे गुणविभेदाने परतत्त्वात कल्पिले ॥ १९७

भोक्तृत्व आणि भोज्यत्व प्रेरकत्वहि ते तसे
सत्त्वादी गुणभेदाने परतत्त्वातही दिसे ॥ १९८

वसे त्रयगुणात्मिका शक्ती ब्रह्मात शाश्वत
गुणे विषम उत्पन्न तिच्या पदार्थ जाहले ॥ १९९

अल्प सत्त्व-तमोयुक्त रजाधिक्य असे जिथे
चैतन्य जे दिसे त्यास भोक्ता नि जीव बोलिती ॥ २००

अति तामस ते भोज्य रसरूपादि सर्वही
शुद्ध सत्त्वगुणे युक्त बोलिती त्यास ईश्वर २०१

भोक्ता भोजयिता भोज्य वस्तू ह्या तीन भासती
कल्पिल्या गुणभेदाने ब्रह्मावरीच शाश्वत २०२

सत्त्वाने शुद्ध जो युक्त शंभू प्रेरयिता असे
संमिश्रोपाधिसंयुक्त त्यांना पशूच नाव हे २०३

शुद्ध तामसरूपी जे गूढ चैतन्य ते असे
दिसे दृष्टीपुढे जे जे भोज्य त्यालाच बोलिती २०४

शंभू प्रेरक सर्वज्ञ अल्पज्ञ जीव जाण तो
अती जे गूढ चैतन्य त्यालाच जड बोलिती २०५

अव्यक्त प्रकृती माया शुद्धाशुद्ध स्वरूप ती
शुद्ध माया शिवाश्रित शिवा मोहात पाडिना २०६

जीवाश्रयी अशुद्ध ती त्यास मोहात गुंतवी
ती अविद्या अधोमाया नावांनी याच जाणती २०७

अविद्येच्या अंशभेदे असंख्य जीव जन्मले
मायाशक्तीमुळे शंभू नाना रूपे धरी तसा २०८

सर्वज्ञ सर्वकर्ता नि नित्यमुक्त महेश तो
अल्पज्ञ अल्पकर्ताच देहधारक जीव तो २०९

अविद्येच्या मुळे होती शिवैक्यज्ञानवंचित
संसारी भ्रमती नित्य कर्मानुसार आपुल्या २१०

देवपक्षिमनुष्यादी भिन्न योनींत जन्मुनी
हिंडती देह घेऊनि जसे चक्र फिरे तसे २११

आयुष्य-भोग-जातीस ठरे कर्मचि कारण
सर्व जीवांस तो शंभू असे साक्षी नि प्रेरक २१२

भ्रमताना असे नित्य कर्मयंत्रनियंत्रक
होतो प्रेरक जीवांचा शंभू हितोपदेशक २१३

जन्मचक्रातुनि मुक्ती देणारा मार्ग सांगतो
होताचि वासना क्षीण कर्म ते पक्व होतसे २१४

शुद्धमानस होई तो जीव शंभुकृपेमुळे
पक्व कर्मांमुळे सर्व होई निर्मल अंतर २१५

मनी निश्चल जागे ती भक्ती शिवकृपेमुळे
मग जीवास त्या शुद्ध पिंड संबोधिती पुढे २१६

## २. पिंडज्ञानस्थल

शरीरात्मविवेकी जो पिंडज्ञ त्यास बोलिती
शरीरचि असे आत्मा चार्वाक सांगती असे २१७

इंद्रियांसी तसे आत्मा मानिती अन्य लोक ते
बुद्धी हीच असे आत्मा बौद्धादी प्रतिपादिती २१८

इंद्रिये-देह-बुद्धीस आत्मा नयेच मानिता
अहंप्रत्यय ज्याठायी आत्मा त्यालाच बोलिती २१९

शरीर इंद्रिये बुद्धी यांहूनि भिन्न शाश्वत
जाणे आत्म्यास जो पिंडज्ञानी त्यालाच बोलिती २२०

कर्मांनी मिळती नाना जाणावे देह नश्वर
राहे देहात तो नित्य आत्मा विवेक हा खरा २२१

भिन्न देहाहुनी आत्मा त्याहूनि भिन्न ईश्वर
असे प्रेरक जो जाणे पिंडज्ञानीच तो असे २२२

## ३. संसारहेयस्थल

मालिन्य नष्टले ज्याचे नित्यानित्यहि जाणतो
संसारत्याज्य ही बुद्धी जागे सुवासनेमुळे २२३

पत्नीपुत्रादिचे सौख्य असे ऐहिक भंगुर
जाणे जो तो कसा इच्छी स्वर्ग क्षणिक भोग ते २२४

जन्मला तो मरे आणि मेला पुनश्च जन्मतो
जन्ममृत्यू चक्रामध्ये भ्रमती जीव सर्वदा २२५

विष्णूने घेतले मत्स्य वराह कूर्म जन्म ते
त्या महात्म्यासही प्राप्त झाले मरण निश्चित २२६

कर्मवशे कुणी जन्मे जातीत शूद्र ब्राह्मण
त्रितापांच्या महाग्नीत सर्वही नित्य पोळिती २२७

कर्मांनी प्राप्त जी दुःखे आध्यात्मिकादि सर्वही
पीडला जीव जो त्यांनी विश्रांती त्यास कोठली २२८

आध्यात्मिक तसे आणि आधिभौतिकही असे
आधिदैविक ही तीन यांना त्रिताप बोलिती २२९

आध्यात्मिक द्विधा दुःख बाह्य आणिक आंतर
वातपित्तादि जी सर्व दुःखे ती बाह्य बोलिती २३०

पोळते राग-द्वेषांनी जाणावे दुःख आंतर
राजा नि लोक जे देती दुःख ते आधिभौतिक २३१

ग्रह-यक्षादिपासूनि मिळे ते आधिदैविक
असा दुःखचि दुःखांनी पीडला जीव सर्वदा २३२

दुःखाने युक्त कर्मांनी बांधिलेल्या जिवा अशा
स्वर्गी वा इहलोकात लाभेना सुखलेशही २३३

विद्युल्लतेत लाटांत दीपज्योतीत पेटल्या
कर्मार्जित धनामध्ये कशी असेल स्थिरता २३४

मलकोशच हा देह दुःखवर्धन जो करी
विजेसमान अस्थिर रुचेल पंडिता कसा २३५

आनंदरूप चैतन्य आत्मतत्त्वास सोडुनी
विवेकी तो रमे कैसा शरीरी दुःखदायक २३६

मनाचा शुद्ध जो ज्ञानी कांक्षी आत्मसुखास जो
पत्नी-पुत्र नि देहात दुःखाचे मूळ जाणतो २३७

मित्र-बांधववर्गास कुलाचार-धनासही
अनित्य पूर्ण जाणूनि करी वैराग्य धारण २३८

विरागी विषयी साऱ्या आत्मसुखात जो रमे
संसारदुःख नाशावे बुद्धी त्याच्यात जागते २३९

नित्यानित्यविवेकी जो पुण्यात्मा शुद्धमानस
ब्रह्मादी देव यांचेही जाणे अस्थिर वैभव २४०

नाशे संसारदुःखास नित्य आनंदरूप जो
चंद्रमौळी शिवाची त्या भक्ती मनात जागते २४१

## ४. गुरुकारुण्यस्थल

त्या विवेकी विरागी नि शुद्ध साधकमानसी
जिज्ञासा भव ध्वंसे जो जागते त्या शिवाविषी २४२

श्रीगुरू लोकविख्यात वर्जितो लोभ मोह ते
आत्मतत्त्वविवेकी जो सोडितो विषय-भ्रम २४३

जाणतो शिवसिद्धान्त संदेहातूनि मुक्त जो
जाणे शास्त्रप्रयोगास सत्यवादी नि धार्मिक २४४

कुमार्ग वर्जिला ज्याने कुळाचारहि आचरे
शिवतत्त्वविवेकी जो शिवध्यानात तत्पर २४५

सर्वांगी उधळी भस्म भस्मतत्त्वास जाणतो
त्रिपुंड्रधारणी गोडी रुद्राक्षे अंग भूषितो २४६

लिंगधारक लिंगाच्या आसक्त अर्चनातही
जाणे लिंगांगयोगास शिवाद्वैतात मग्न जो २४७

अंग-लिंगस्थले भेद जाणे मंजूळ बोलतो
लक्षणांनी अशा युक्त व्हावे नम्र गुरूपुढे २४८

षण्मास-वर्षपर्यंत होऊनि शरणागत
सेवावे परमाचार्या होई प्रसन्न तोवरी २४९

जोडूनि कर प्रार्थावे भक्तीने नम्र होउनी
हे आचार्य महाभागा सर्वकल्याणकारका २५०

शिवज्ञानसमुद्रा मी भवरोगेचि ग्रासलो
रक्ष रक्ष मला आता करावी प्रार्थना अशी २५१

पाहूनि शक्तिपाताची शिष्य-अंगात लक्षणे
द्यावी शिष्यवरा दीक्षा गुरूने पाशमोचक २५२

देई ज्ञान शिवाचे जी दीक्षा तिलाच मानिती
प्रभेद तीन दीक्षेचे शैवागमज्ञ सांगती २५३

वेधा क्रिया तशी मांत्री अशी त्रिविध ती असे
श्रीगुरूच्या कटाक्षे नि हस्ते मस्तक स्पर्शिता २५४

शिवत्वबोध होई ती वेधा म्हणविली असे
बोधिते मंत्र ती मांत्री दीक्षा पंडित मानिती २५५

शुभमास-तिथी-काली सुदिनी विधिपूर्वक
क्रियाप्रधान जी दीक्षा तीच क्रिया प्रशंसिती २५६

शिवभक्तास तांबूल-विभूती आदि देउनी
विधिपूर्वक शिष्यास आणावे देशिके स्वये २५७

लेऊनि शुभ्र प्रावर्णे सर्वांगे शुद्ध होउनी
पूर्वाभिमुख शिष्याने बैसावे श्रीगुरूपुढे २५८

शिवाचे नाम गाऊनि करावे शिवचिंतन
सर्वांगी भस्म त्रिपुंड्र चर्चावे विधिपूर्वक २५९

शिष्यमस्तक सिंचावे त्रिवेळा कलशोदके
मंत्र पंचाक्षरी कर्णी बोधावा मुक्तिदायक २६०

कोणास न कळे गूढपणे कर्णात दक्षिण
छंद रूप ऋषी न्यास सांगावे स्पष्ट सर्वही २६१

## ५. लिंगधारणस्थल

पाषाण-स्फटिकांतूनि सूर्य-चंद्रमण्यांतुनी
घडले लिंग जे किंवा बाणलिंग नदीतले २६२

पवित्र लक्षणे युक्त घ्यावे पूर्ण परीक्षुनी
ठेवूनि करपीठी ते पूजावे अभिषेकुनी २६३

विधियुक्त कला शैवी करूनि त्यात स्थापित
गुरूने शिष्यप्राणास करावे स्थित त्यामधे २६४

शिव-जीवकलायुक्त लिंगांग एक जाहले
लिंग शिष्यकरी द्यावे गुरूने विधिपूर्वक २६५

प्राणासमान हे लिंग करावे नित्य धारण
करावे ना कधी कोठे देहापासूनि वेगळे २६६

प्रमादे पडले खाली देहावरूनि हे जरी
त्यागावा प्राण तत्काळ लाभेल मोक्षसंपदा २६७

असे शिष्यास बोधावे गुरूने शास्त्रपंडित
जोवरी प्राण देहात करी धारण तोवरी २६८

पातके नाशिते लिंगधारण पुण्यदायक
स्वीकारिती मुनी सर्व आगमांचे विशारद २६९

पुरवी कामना सर्व असे द्विविध धारण
बाह्य आणिक आंतर मोक्षार्थी सांगती मुनी २७०

चिद्रूप श्रेष्ठ हे लिंग सर्वांचे मूळ कारण
हृदयी चिंतिणे त्यास जाण आंतर धारण २७१

विश्वमूळ परब्रह्म चिद्रूप शिवनामक
निर्विकल्प गुणातीत सर्व दोषांपलीकडे २७२

चिदानंद कलारूप प्रमाणांसी अगोचर
दाखविता नये कोणा मुमुक्षू हे उपासिती २७३

संबोधिती महालिंग प्रपंचातीत श्रेष्ठ हे
त्रिस्थळी जीवमात्रांच्या प्रत्यया नित्य येतसे २७४

मूलाधारात हृत्स्थानी भ्रूमध्यातहि ते तसे
ज्योतिर्मय महालिंग सर्वकाळ प्रकाशते २७५

अखंड ब्रह्म अव्यक्त शाश्वत एक हे जरी
अर्चनेस्तव मायेने दिसे खंडित जाहले २७६

चराचर जिथे पावे अंती विलय निश्चित
ज्यातूनि जन्मते तेचि लिंग ब्रह्म सनातन २७७

लिंग नामेचि प्रख्यात सच्चिदानंदरूप ते
सर्वपोषक मोठेही म्हणूनि ब्रह्म बोलिती २७८

आधारी हृदयी किंवा भ्रूमध्यात निरंतर
ज्योतिर्लिंगास ध्यावे हे लिंगधारण आंतर २७९

सोन्यासमान आधारी हृदयी पोवळ्यासम
स्फटिकासम भ्रूस्थानी ध्याती लिंगास योगी ते २८०

अंतरी ध्यान लिंगाचे बोलिती निरुपाधिक
बाह्य लिंगाहुनी कोटी गुणांनी श्रेष्ठ ते असे २८१

चैतन्यरूप लिंगास ध्याती जे अंतरी सदा
संसारी घोर येतीना पुन्हा फिरूनि मागुते २८२

अंतर्लिंगानुसंधान आत्मविद्यापरिश्रम
गुरूपासनशक्ती ही मोक्षधनास कारण २८३

वैराग्य ज्ञान सुस्थिर बुद्धी ज्याजवळी असे
अंतर्ध्यानात मग्न तो नच बाहेर येतसे २८४

ब्रह्मा विष्णु नि रुद्रादी इंद्र दिक्पाल ते तसे
मुनि गंधर्व सिद्धादी दैत्य आणिक मानव २८५

पाहती ज्ञानदृष्टीने सर्वकारण कारण
लिंगास हृदयी नित्य परमानंदलक्षण २८६

म्हणूनि सर्वसायासे ध्यावे लिंगास अंतरी
लिंगध्याने मिळे मुक्ती पंचक्लेशांतुनी सदा २८७

लिंगध्यानात आंतर असो समर्थ वा नसो
इष्टलिंगास मानावे रूप चिन्मय निश्चये २८८

सांगती लिंग त्रिविध स्थूल सूक्ष्म परात्पर
इष्टलिंग शरीरी जे विराजे स्थूल मानिती २८९

अंतरी सूक्ष्म जे ध्याती बोलिती प्राणलिंग ते
भावनामय ते श्रेष्ठ तृप्तिलिंग परात्पर २९०

भावनातीत अव्यक्त ब्रह्म जे शिवनामक
अनिष्ट नाशिते सर्व जाणावे इष्टलिंग ते २९१

नाशे अनिष्ट संसार इष्ट मुक्तीच लाभते
म्हणूनि अवधानाने करावे लिंगधारण २९२

कंठात मस्तकी किंवा कक्ष-वक्ष:स्थली तसे
उदरावरी तळहातात करावे लिंग धारण २९३

नाभिखाली जटेमध्ये पाठ किंवा मल-स्थली
करिता धारण जाणावे पापकारण निश्चित २९४

लिंगधारी सदा शुद्ध इष्टलिंग मनोहर
पूजावे गंध आदींनी करपीठात स्थापुनी २९५

बाह्यपीठाहुनी श्रेष्ठ पूजा हस्ततलावरी
समस्त वीरशैवांस मुमुक्षूंना निरंतर २९६

विष्णुब्रह्मादि ते देव गौतमादिक ते मुनी
सदैव मस्तकी प्रेमे करिती लिंग धारण २९७

लक्ष्मी नि देवता सर्व शिवभक्तीत तत्पर
करिती लिंगधारण मस्तकी निज सर्वदा २९८

वेदशास्त्र-पुराणांत कामिकादि शिवागमी
लिंगधारण शैवांचे निश्चये प्रतिपादिले २९९

पवित्रं ते विततम् या मंत्री वेदांत बोलिले
लिंगरूप शिवाचे हे करावे नित्य धारण ३००

लिंग हेचि परब्रह्म ब्रह्मयाचा असे पती
त्याच्या पवित्र संपर्के होतसे शुद्ध देह हा ३०१

संस्कारशून्य अज्ञानी तपोहीन अपक्व जो
दीक्षारहित जो त्याने लिंग घालू नये स्वये ३०२

शांत निष्पाप हे रुद्रा तुझे लिंगशरीर हे
प्रकाशे जीवदेहांत यजुर्वेदात बोलिले ३०३

संयमी लिंगधारी नि रमे शिवार्चनेत जो
करावे नित्य भस्माचे त्याने शास्त्रोक्त धारण ३०४

## ६. भस्मधारणस्थल

शोभला देह भस्माने होई पवित्र निश्चल
शिवनाम करी पूर्ण शिवतत्त्व प्रकाशित ३०५

प्रकाशे विश्व तेणेचि त्याला भसित बोलिती
महाभस्म महादेव असे प्रकाशरूप तो
हृदयी त्यास ध्याती जे मुख्य ते भस्मधारक ३०६

मंत्रन्यासादि योगाने शिवाग्नीतुनी जाहले
ते सोपाधिक जाणावे सांगती तंत्रपंडित ३०७

विभूती भसितं क्षार रक्षा नि भस्म पाच ही
भस्माची ठेविली नावे पाच त्या कारणांमुळे ३०८

विभूती देत ऐश्वर्य भसितं तत्त्व दाखवी
जाळिते भस्म पापांस रक्षिते क्षार आपदी ३०९

भूतांपासूनि रक्षिते रक्षा म्हणूनि बोलिती
नंदा भद्रा सुशीला नि सुरभी सुमना अशा ३१०

जन्मल्या पाच गायी या शिवपंचमुखांतुनी
कृष्णा कपिल शुभ्रा नि धूम्रा आरक्तरंगि त्या ३११

गोमयांतूनि त्यांच्याच भस्मे ती पाच जाहली
चर्चावी पाच भस्मे ही हेतूनुसार आपुल्या ३१२

विभूती नित्यकर्मात निमित्ती भसितं तसे
काम्यकर्मात ते क्षार लावावे यत्नपूर्वक ३१३

प्रायश्चित्तात लावावे भस्म ते विधिपूर्वक
मोक्षकार्यात रक्षा ही करावी नित्य धारण ३१४

गार्यींचे वर्ण जे तेचि भस्माचे असती क्रमे
कपिला कृष्ण तो शुभ्र धूम्रवर्णी नि तांबडा ३१५

सांगती भस्मनिर्माण प्रकारे चार होतसे
कल्पानुकल्प ते आणि अनुकल्प-अकल्पही ३१६

कल्पनिर्मित जे भस्म तेचि उत्तम मानिती
ते न मिळे तरी अन्य चर्चावे विधिपूर्वक ३१७

शास्त्रोक्त प्रकाराने ते समंत्र गोमयातुनी
निर्माण करणे भस्म त्यालाच कल्प बोलिती ३१८

रानात पडल्या शेणी त्यातूनि विधिपूर्वक
पूर्वोक्त होतसे तैसे ते अनुकल्प बोलिती ३१९

अन्य आणूनि संस्कार करिता त्यावरी जरी
उपकल्पचि ते जाण अकल्प विधिहीन ते ३२०

पात्रात वा कलशामध्ये घेऊनि विधिपूर्वक
त्रिवेळा एकदा नित्य करावे भस्मस्नान ते ३२१

सुस्नात होउनी वामकरी भस्मास घेउनी
मंत्राने अष्टवेळा ते करावे अभिमंत्रित ३२२

मस्तकी मुखि वक्षी नि गुह्यस्थानी पदांवरी
सर्वांगावरी सिंचावे बोलिती भस्मस्नान ते ३२३

वारुणादिक स्नानांत आग्नेय स्नान मुख्य हे
मल बाह्य नि आंतर नाशिते भस्मस्नानचि ३२४

नाशिती भस्मस्नानाने दोष बाह्य नि आंतर
मग त्याला नसे अन्य स्नानांचेही प्रयोजन ३२५

ब्रह्मादी देवता सर्व नारदादिक ते मुनी
सनकादिक योगीही बाणासुरादि दानव ३२६

सर्वदा भस्मस्नानात रमूनि शिव पूजिती
मुक्त दोषांतुनी सर्व होऊनि शुद्ध वर्तती ३२७

दोष ते सप्तजन्मांचे कराया दूर निश्चित
भस्मोद्धूलन त्रिपुंड्र करावे नित्य धारण ३२८

भस्मसिंचन याहूनि श्रेष्ठ त्रिपुंड्र धारण
सिंचनाविण चर्चावे भाळी त्रिपुंड्र निश्चित ३२९

जलाने युक्त त्रिपुंड्र करावे नित्य धारण
साधके पंधरा स्थानी शरीरावर उत्तम ३३०

ललाटी मस्तकी कर्णी कंठ-भुजांवरी तसे
वक्ष-नाभिस्थली आणि पाठ नि दंड यांवरी ३३१

मानेवरी नि दोन्हीही मणिबंधांवरी तसे
मंत्रपूर्वक त्रिपुंड्र करावे नित्य धारण ३३२

जलाने युक्त त्रिपुंड्र चर्चिता पंधरा स्थली
शांत शिवस्वरूपाचा होतसे लाभ निश्चित ३३३

बोटांनी मधल्या तीन रेखावे स्पष्ट देखणे
शास्त्रोक्त पद्धती सर्व घ्यावी जाणूनि पूर्णतः ३३४

शुभ्र देखणे सुस्पष्ट सर्वलक्षणयुक्त ते
चर्ची त्रिपुंड्र भाळी तो रुद्र यात न संशय ३३५

प्रातःकाळी नि मध्यान्ही सायंकाळीहि ते तसे
त्रिपुंड्र रेखिता भाळी पूर्ण होती मनोरथ ३३६

ब्रह्मा विष्णू नि इंद्रादी वसिष्ठादी महामुनी
सर्वदा रेखिती भाळी त्रिपुंड्र पुण्यदायक ३३७

वेदागम-पुराणांत अन्य शास्त्रांतही तसे
भस्मधारण शैवांचे सर्वत्र प्रतिपादिले ३३८

नास्तिक शास्त्रद्रोही नि दुराचारी असो कुणी
त्रिपुंड्र रेखिता होतो मुक्त तो पातकांतुनी ३३९

## ७. रुद्राक्षधारणस्थल

भस्मस्नान करावे नि भाळी त्रिपुंड्र धारण
रुद्राक्षांनी तसे प्रेमे भूषवावे शरीरही ३४०

रुद्राक्षधारणेने ती पातके सर्व नाशिती
दुराचारी मनोबुद्धी मळलेला असो कुणी ३४१

कराया त्रिपुरसंहार शिवाने नेत्र रोखिता
योगाश्रू गळले खाली तेचि रुद्राक्ष जाहले ३४२

रुद्र-अक्षांतुनी झाले तेणे रुद्राक्ष बोलिती
मानिती प्राज्ञ उत्पत्तिभेदाने अडतीस ते ३४३

सूर्यनेत्रातुनी झाले बारा रुद्राक्ष आणिक
चंद्रनेत्रातुनी सोळा अग्निनेत्रातुनी दहा ३४४

सुवर्णासम अच्छिद्र घातले ना कुणी कधी
रुद्राक्षे शिवभक्ताने भूषवावे शरीर ते ३४५

रुद्रसायुज्य मुक्तीस प्राप्त करावयास्तव
शास्त्रानुसार रुद्राक्ष करावे पूर्ण धारण ३४६

शिखेत मस्तकी भाळी कर्णी कंठामधे तसे
शास्त्रानुसार बांधावे बाहू-मनगटांवरी ३४७

रुद्राक्षमाळ कंठात रुळावी सर्वकाळ ती
असावा देह भक्ताचा सदा रुद्राक्षमंडित ३४८

असो मूढ जरी त्याने केले रुद्राक्षधारण
त्यास पातक स्पर्शेना नसेचि यात संशय ३४९

कृतघ्न घातकी किंवा असो सुवर्णतस्कर
रुद्राक्षधारणे त्याची पातके सर्व नाशती ३५०

पाहिले स्पर्शिले आणि स्मरिले पूजिले जरी
रुद्राक्ष नाशिती सर्व लोकांची पूर्ण पातके ३५१

असो ब्राह्मण वा शूद्र किंवा मूर्खहि पंडित
रुद्राक्षधारणे होतो मुक्त तो पातकांतुनी ३५२

गोदान करिता कोटी लाभे दात्यास जे फळ
रुद्राक्षधारणे तेचि मृत्युलोकात लाभते ३५३

रुद्राक्ष घालुनी पाणी अंत्यकाळात प्राशिता
रुद्रलोकात जाई तो उद्धरूनीच निश्चित ३५४

सर्वांगी शोभते भस्म असे रुद्राक्षमंडित
महात्मा तो असे रुद्र यात काही न संशय ३५५

आचरे सर्व कर्मादी जरी शास्त्रोक्त ब्राह्मण
रुद्राक्षभस्मवंचित तरी ते होय निष्फल ३५६

आश्रमी चहु वर्णांत सदाचारी जनांतही
रुद्राक्षभस्मधारीच असे तो श्रेष्ठ निश्चित ३५७

## ८. पंचाक्षरी जपस्थल

रुद्राक्षभस्मसंपन्न पवित्र लिंगधारके
पंचाक्षरी जपावा तो मंत्र जो शिवबोधक ३५८

शिवतत्त्वाहुनी श्रेष्ठ नसे तत्त्व दुजे जसे
तसा पंचाक्षरीहूनि मंत्र श्रेष्ठ न कोणता ३५९

ज्ञात पंचाक्षरी होता अन्य मंत्र निरर्थक
शिवज्ञानामुळे जशा देवता अन्य निष्फल ३६०

मंत्रांत सप्तकोटी त्या श्रेष्ठ पंचाक्षरी असे
जसा ब्रह्मादि देवांत महादेव महान तो ३६१

जगाचे मूळ संपूर्ण परमात्मा महेश्वर
त्याचा वाचक हा मंत्र सर्व मंत्रांस कारण ३६२

वाच्य-वाचकसंबंध शिव-मंत्रांमधे असे
होई मंत्रामुळे शंभू सिद्ध आणि प्रकाशित ३६३

नम: आधी असे ज्यात अंती शिवाय बोलिती
मंत्र पंचाक्षरी नामे जाणती लोक सर्वही ३६४

देवांचा देव जो सर्व मंगलांचाहि आश्रय
जाणती शिव शब्दाने अभिधान यथार्थ हे ३६५

अक्षरे शिव ही दोन प्रत्यक्ष शिव बोधिती
अन्य नामे शिवाची ती असती गुणबोधक ३६६

शिव हा शब्द मुख्यत्वे पंचाक्षरीत त्यामुळे
मुमुक्षूंनी जपावा हा सर्वदा मंत्र आदरे ३६७

महादेव जसा देतो मुक्ती पूर्ण भवातुनी
तसा पंचाक्षरी मंत्र असे संसारनाशक ३६८

पंचभूते नि तन्मात्रा पंच ज्ञानेंद्रिये तशी
पंचाक्षर महामंत्रापासूनि सर्व जन्मली ३६९

पंच पंच असे जे जे प्रसिद्ध जगती असे
झाले ते सर्व उत्पन्न जाण पंचाक्षरीतुनी ३७०

मंत्र पंचाक्षरी आधी जरी ॐकार लाविला
शैवागमांत वेदांत मानिती तो षडक्षर ३७१

बोधी ॐकार शंभूचे सच्चिदानंदरूपचि
निष्प्रपंच चिदानंद एकाक्षरे प्रकाशते ३७२

सोऽहं मंत्रातुनी दोन ह स हे वर्ण लोपता
उरतो शेष ॐकार ब्रह्म जो प्रतिपादितो ३७३

बोधी ॐकार शंभूचे रूप निष्कल पूर्णत:
आणि सकल रूपास बोधी पंचाक्षरी तसा ३७४

बोधी षडक्षरी दोन्ही रूपे सकल निष्कल
मंत्री सामावली एका रूपे उभय निश्चित ३७५

मूल पंचाक्षरी विद्या शिव नि शैवसूत्र ह्या
नामे विख्यात हा मंत्र असे सर्वत्र भूवरी ३७६

सर्व मंत्रांस हा मूळ म्हणूनि मूल बोलिती
अक्षरे पाच याच्यात तेणे पंचाक्षरी असे ३७७

लाभे विद्या जपे त्याला विद्या म्हणूनि नाम हे
सर्वमंगलदायी हा म्हणूनि शिव बोलिती ३७८

सूत्र भक्त-शिवांतील मानिती शैवसूत्र हा
असा श्रेष्ठ महामंत्र जपावा भक्तिपूर्वक ३७९

पंचाक्षरीत ॐकार मिळे तोचि षडक्षर
जपावा नित्य भक्ताने शिवपूजापरायण ३८०

प्राणायामासवे चित्ती ध्यावा सांब सदाशिव
एकाग्र पूर्ण होऊनि जपावा मंत्र सर्वदा ३८१

जप वाचिक तो आणि उपांशू आणि मानस
जपता मंद ऐकू ये त्याला वाचिक बोलिती ३८२

हलती ओठ थोडेसे उपांशू जप तो असे
हाले न ओठ जिव्हाही चाले तो आत मानस ३८३

कर्मयज्ञ व्रते दाने तपे पंचाग्नि सर्वही
करिता एक मंत्राशी सोळांशेही तुळेचि ना ३८४

गुणे शत उपांशू तो फल दे वाचिकाहुनी
उपांशूहूनि सहस्त्र गुणे दे फळ मानस ३८५

उपांशु-वाचिकांहूनि श्रेष्ठ मानिती मानस
मुमुक्षूंनी जपावा तो घोरसंसारनाशक ३८६

विधिपूर्वक भक्तीने जपावा एक कोणता
जपे पंचाक्षरी नित्य अविद्येतूनि तो सुटे ३८७

विशुद्ध शिवभक्ताने यमादी सर्व पाळुनी
मंत्रपूर्वक लिंगास पूजावे भक्तिपूर्वक ३८८

सद्भावे एकवेळा जो समंत्रे लिंग पूजितो
जाई तो शिवलोकात मंत्रबळेचि निश्चित ३८९

भक्षूनि जल-वायूसी व्रत-तपांत मग्न जे
जाती न शिवलोकी तो मिळे पंचाक्षरीमुळे ३९०

तप यज्ञ व्रते आदी कोट्यंशे तुळतीचि ना
मंत्र पंचाक्षरी युक्त शिवपूजेबरोबर ३९१

पुण्यात्मा पातकी कोणी समंत्रे शिव पूजितो
एकवेळा तरी मुक्ती त्यास लाभे न संशय ३९२

पंचाक्षरी महामंत्र उच्चारिताच एकदा
नाशिती पातके पूर्ण जीवांची सर्व निश्चित ३९३

आगमी अन्य जे मंत्र जपता ते अनेकदा
मगचि पूर्ण जीवाचे करिती ते मनोरथ ३९४

मंत्र पंचाक्षरी मात्र महासामर्थ्यवानचि
उच्चारिता एकवेळा सर्वसिद्धीच देतसे ३९५

मंत्रपूर्वक जो पुष्प करी लिंगास अर्पण
लाभे सहस्त्र यज्ञांचे त्यास ते फल निश्चित ३९६

वेदाध्ययन-यज्ञादी अग्निहोत्र नि दक्षिणा
पंचाक्षरी जपाच्या ते कोट्यंशाशी तुळेचि ना ३९७

शिवैकनिष्ठ सानंद योगींद्रे जीव नारकी
उच्चारूनि महामंत्र तारिले नरकातुनी ३९८

शतानंद ऋषींनीही महामंत्र बळावरी
नरकाचाच केला तो संगिरास्तव स्वर्गचि ३९९

जाहला उपमन्यू तो आचार्य शिवपंडित
वसिष्ठादी मुनी सर्व जाहले सिद्ध यामुळे ४००

ब्रह्मादी देवतांनाही जगत्कार्य करावया
सामर्थ्य लाभले पूर्ण महामंत्र जपामुळे ४०१

भक्तिपूर्वक लिंगासी मंत्रे प्रणवयुक्त ह्या
पूजिता पाप नाशूनि मोक्षलक्ष्मीस पावतो ४०२

## ९. भक्तमार्गक्रियास्थल

शोभे रुद्राक्षभस्माने लिंगधारी पवित्र जो
जपे पंचाक्षरी नित्य शिवभक्तचि जाण तो ४०३

नवधा भेद भक्तीचे जाणा श्रवण कीर्तन
स्मरणं पादसेवा ती अर्चना आणि वंदन ४०४

दास्य आणिक ते सख्य आणि आत्मनिवेदन
पाप्यांस दुर्लभा सर्व पुण्यात्म्यांस सुलभ्य त्या ४०५

उच्च नीच असो कोणी भक्ती ज्याच्यात उत्कट
वसे तोचि असे जाण शिवभक्त सुनिश्चित ४०६

स्थिर ज्याच्या मनी भक्ती असो ब्राह्मण शूद्र वा
भक्तिवंचित ब्राह्मण नसे शंभूस प्रिय तो ४०७

सांगती द्विविधा भक्ती बाह्य आणिक आंतर
बाह्य स्थूल असे आणि सूक्ष्म आंतर बोलिती ४०८

शुद्ध भूमीवरी रम्य रत्नसिंहासनावरी
बैसूनि लिंग पूजावे तिलाच बाह्य बोलिती ४०९

लिंगात प्राण प्राणात लिंगाचे सामरस्य ते
साधिल्या भावस्थितीला भक्ती आंतर बोलिती ४१०

भक्ती आभ्यंतरा प्राप्त होता कर्मेचि सर्वही
दग्ध बीजेचि होऊनि होती न जन्मकारण ४११

सांगू अधिक ते काय रहस्याचे रहस्य हे
लाभते ज्यास तो मुक्त होई न यात संशय ४१२

लाभे शिवप्रसादाने भक्ती भक्तीमुळे कृपा
बीजातूनि जसा कोंब बीज कोंबातुनी जसे ४१३

लाभे शिवकृपेने जी सद्भक्ती मुक्तिदायक
प्राप्त जन्मात एकाच शक्य न मानवास ती ४१४

जन्मी अनेक सत्कर्मे करूनि शुद्ध जाहला
ज्ञानी विरक्त त्यावरी होतो प्रसन्न शंकर ४१५

प्रसन्न शिव होताचि एका जन्मात मुक्त तो
अल्पभक्ती जयापाशी तीन जन्मांत मुक्त तो ४१६

सांगा न्यूना असे दोन भक्तीचे भेद सांगती
रुजे नवविधा चित्ती सांगा तिलाच बोलिती ४१७

अंगांसहित ती सांगा पूर्णभक्तीच जाण ती
लाभता भक्त संसारी पुन्हा घेई न जन्म तो ४१८

काया-वाचा-मनोभेदे सांगा त्रिविध होतसे
कायिकी वाचिकी आणि मानसीही तशी असे ४१९

शिवचिंतनरूपा जी भक्ती ती जाण मानसी
वाचिकी जपस्तोत्रादी कर्मप्रधान कायिकी ४२०

रमे जे शिवध्यानात तेचि मन दुजे नसे
रमे शिवजपामध्ये वाणी तीच खरी असे ४२१

शोभे रुद्राक्षभस्माने देह तोचि असे खरा
असे अनन्यभावाने करणे पूर्ण चिंतन ४२२

मानिती श्रेष्ठ ही भक्ती जाणावी हीच मानसी
वाचिकी शिवस्तुत्यादी शिवपूजादि कायिकी ४२३

मन-वाणी-शरीराने पूजा पंडित मानिती
बाह्य आभ्यंतरा आणि बाह्याभ्यंतर त्रिविध ४२४

शिवपूजादि कर्मांस नेत्रांनी लोक पाहती
पूजेस बाह्य पूजा त्या मानिती तंत्रपंडित ४२५

पडेना अन्य दृष्टीस जाणे केवळ पूजक
पूजा आभ्यंतरा तीच जाणावी पूर्ण निश्चये ४२६

रमे बाह्य नि आंतर लिंगांत चित्त सारखे
अधेमधेचि ती पूजा बाह्याभ्यंतर मानिती ४२७

प्रकार पाच पूजेचे मानिती सुज्ञ आणखी
तप कर्म जपोध्यान आणि ज्ञान अनुक्रमे ४२८

शरीर शिवपूजेत झिजावे तप हे असे
कृच्छ्रचांद्रायणादीस तप सुज्ञ न मानिती ४२९

शिवार्चनेत आसक्त राहणे हेच कर्म ते
यज्ञयागादि कर्मांस खरी कर्मे न मानिती ४३०

करणे प्रणवाभ्यास मंत्र पंचाक्षरी जप
रुद्राध्यायादिकाभ्यास नसे वेदादि वाचन ४३१

करणे ध्यान आत्म्याचे नसेचि ध्यान ते खरे
चिंतिणे शिवरूपास ध्यान हेचि खरे असे ४३२

शिवागमांतुनी ज्ञान लाभे जे ज्ञान ते खरे
बोधिती अन्य शास्त्रे जे नसे ते ज्ञान निश्चित ४३३

प्रकार पाच पूजेचे शिवयज्ञचि पंच हे
आचरे पूर्ण भक्तीने जाणावा भक्त तो खरा ४३४

पूजिता शिवभक्तांस सद्गती प्राप्त होतसे
अवमान करी त्यास प्राप्त रौरव निश्चित ४३५

तेजस्वी शिवभक्ताने शिवभक्तिविहीन जो
स्पर्शू पाहू नये त्यास करावी नच संगत ४३६

शिवदीक्षित भक्ताने द्यावा भक्तांस आदर
वर्तती निश्चये पूर्ण शिवागमांनुसार जे ४३७

स्वधर्मनिष्ठ भक्तांच्या घ्यावे गृहीच भोजन
आचारहीन जे त्यांच्या गृही घेऊ नये कधी ४३८

भवीने प्राकृताचारी जरी धनादि अर्पिले
स्वीकारार्ह तरी घेऊ नये कधीच निश्चये ४३९

पुजू स्मरू नये ध्याऊ कदापि अन्य देवता
सेवावे न कधी त्यांना अर्पिलेले पदार्थही ४४०

अन्य देव वसे जेथे जावेच ना कधी तिथे
अन्य देव पुजे त्याचे वर्जावे मुखदर्शन ४४१

शिवैकनिष्ठसंपन्न वीरशैवांस सर्वदा
स्थावरलिंग-निर्माल्यप्रसादादी निषिद्ध ते ४४२

अपाय स्थिरलिंगासी शिवभक्तांसही तसा
होता तेथे निवारावे प्राण देऊनि संकट ४४३

रक्षाया लिंग-भक्तांस जरी प्राणहि वेचिले
शिवकार्यामुळे त्याला शिवसायुज्य लाभते ४४४

शिवनिंदा करी त्याचा करावा प्राणघातचि
वाक्ताडन करावे वा त्यागावे स्थल त्याक्षणी ४४५

आचार निंदिती जेथे तेथे जाऊ नये कधी
होई निंदा शिवाची ते त्यागावे घर निश्चये ४४६

अधीश सर्व भूतांचा निंदिता विश्वनायक
शत वर्षांतही त्याचे परिहारे न पातक ४४७

पूर्वकर्मांस त्यागावे भक्ताने लिंगदीक्षित
न त्यागिता करी पूजा तरी ती होय निष्फल ४४८

लाभता सद्गती कर्म आचरे हीन तो जरी
मानिती सर्व कर्मांत त्यास पूर्ण बहिष्कृत ४४९

पंचाक्षरी जपे त्याने जरी केली नरस्तुती
तो अलिंगी दुराचारी आणि कुकवि मानिती ४५०

चर्मपात्रामधे तेल न घ्यावे जलही तसे
भक्तितत्पर भक्ताने घेता रौरव निश्चित ४५१

जन्म मृत्यू रजो जाती उच्छिष्ट पंचसूतके
नसती शिवभक्तास रूपाने पारमार्थिक ४५२

लिंगपूजक नारीला नसेचि ऋतुसूतक
प्रसूतिकाळ येताही तेही नसेचि निश्चित ४५३

गृही प्रसूत स्त्री होता नसे सूतक त्या गृही
शिवपादोदकाने ते नाशिते सर्व पापही ४५४

पाहावे शिवक्षेत्रांस जावे तीर्थस्थळांसही
करावा अति प्रेमाने शिवयात्रामहोत्सव ४५५

शिवक्षेत्रांस यात्रेस जाती जे भक्तिपूर्वक
त्यांना मार्गात ओपावे जल-अन्नादि सर्वही ४५६

अन्नासम नसे दान अहिंसेसारखे तप
म्हणूनि जल-अन्नाचे करावे दान नित्य ते ४५७

आचारकुलसंपन्न आणावी गृहस्वामिनी
आणि कुळात तैशाच द्यावी कन्याहि आपुली ४५८

असे आचारसंपन्न करावे व्रतपालन
करावे पूर्ण भक्तीने गुरुलिंगादि पूजन ४५९

## १०. उभयस्थल

प्रत्यक्ष शिवपूजाचि गुरुपूजेमुळे घडे
नसे शिव-गुरूंमध्ये भेद तेथे अभेदचि ४६०

कृपावंत शिवाची त्या अर्चना करितो जशी
तसे गुरुवरा नित्य पूजावे भक्तिपूर्वक ४६१

अगोचर महादेव मायाशक्तीमुळे पुढे
प्रत्यक्ष गुरुरूपाने दिसे भक्ती करावया ४६२

संसारसागरी घोर शिवज्ञानचि तारिते
गुरू ते ज्ञान देणारा वंदनीय कसा नसे ४६३

ज्याच्या कृपाकटाक्षाने परमानंदरूप जे
शिवत्व लाभते ऐसा गुरू पूजी न कोण तो ४६४

प्रशांत शिवज्ञानाब्धी सुखवावे गुरूप्रती
देहे धने झिजावे नि वर्तावे हितकारक ४६५

लंघू नये कधी आज्ञा गुरूची सिद्धकाम जो
शिवाज्ञा तीच मानावी न भंगावी कदापिही ४६६

## ११. त्रिविधसंपत्तिस्थल

गुरु-लिंगांप्रमाणेच पूजावे नित्य जंगमा
भक्तिपूर्वक भक्ताने अभेद त्यांत मानुनी ४६७

शिव एकचि प्रत्यक्ष पूर्ण कृपा करावया
वर्ततो घेउनी रूपे गुरू लिंग नि जंगम ४६८

लिंगाचे सांगती भेद स्थिर आणिक जंगम
स्थिरलिंगाप्रमाणेच पूजावे जंगमासही ४६९

पाषाण-मृत्तिकेचे ते असे लिंग अजंगम
मानिती शिवयोग्यासी लिंग जंगम निश्चित ४७०

स्थिर लिंगात मंत्रांच्या संस्कारे वसतो शिव
नित्य जंगमलिंगात राहे तेणेचि श्रेष्ठ ते ४७१

शिवयोग्यास देती जे फळे ते दान अक्षय
म्हणूनि सर्वसायासे द्यावे त्यालाच दानही ४७२

पूजिता शिवयोग्यासी जीवा जे फळ लाभते
असे अक्षय ते पूर्ण शिवागमज्ञ सांगती ४७३

भेटता शिवयोग्यासी अवमानू नये कुठे
करिता दुर्गती प्राप्त यात नसेचि संशय ४७४

गुरु-लिंगाप्रमाणेच मानूनि शिवरूप ते
पूजावे शिवयोग्यास सेवाभावेचि निश्चित ४७५

## १२. चतुर्विधसारायस्थल

लिंगपादोदका भक्त घेई आदरपूर्वक
गुरु-जंगम यांचेही घ्यावे तसेचि निश्चये ४७६

मांगल्य मंगलांचे जे पावनातही पावन
शिरोधार्यचि पादांबू सर्वसिद्धिप्रदायक ४७७

आदरे मस्तकी घेता फूल पान शिवार्पित
लाभे क्षणोक्षणी पौण्डरीकाचे फळ निश्चित ४७८

केले अर्पित रुद्रास सेवावे जल अन्न ते
अर्पिले पुष्प हुंगावे श्रुती जाबाल सांगते ४७९

फूल पान फळे सर्व इष्टलिंगास अर्पिणे
अन्नादी भोज्य जे काही सेवावे अर्पुनीच ते ४८०

शंभू सामर्थ्यसंपन्न तेजस्वी नि जगद्गुरू
म्हणूनि शिवनिष्ठाने सेवावे त्यास अर्पुनी ४८१

लिंगधारक लोकांस शिवैक जे परायण
प्रसाद योग्य त्यांनाच जीवांस अन्य तो नसे ४८२

भक्षिता शिवप्रसाद शितागणिक एक त्या
लाभते पुण्य यज्ञाचे केल्याने अश्वमेध तो ४८३

शिवे स्वीकारिले तेणे शिवनिर्माल्य शुद्धचि
सेवावे शिवभक्तांनी नच अन्य जने कधी ४८४

भक्तिशून्य जना पाप जरी निर्माल्य सेविले
घेण्या शिवप्रसादास नसती योग्य लोक ते ४८५

लाभे लिंगप्रसादास भक्षिता फल जे जना
तेचि लाभे गुरू आणि जंगमांचाहि सेविता ४८६

शिवयोगी गुरू आणि इष्टलिंगप्रसादही
सेवावा नित्य भक्तीने पुजूनि त्यांस आदरे ४८७

## १३-१४-१५ सोपाधि- निरुपाधि-सहज दानस्थले

शिवलिंग-शिवाचार्य-शिवयोग्यांस नित्यही
देऊनि दान पूजावे घ्यावा प्रसाद आदरे ४८८

सोपाधी निरुपाधी हे आणि सहज दान ते
दानप्रकार वर्णिती सर्वतंत्रविशारद ४८९

फलाच्या अभिलाषेने करिती दान जे कुणी
सोपाधिकचि ते जाण मोक्षार्थी न अपेक्षिती ४९०

फलाशेविण केलेले बुद्धीने जे शिवार्पण
निरुपाधिक ते दान सांगती दानपंडित ४९१

देता घेता नसे ज्यात भाव किंचितही कुठे
अकर्ता भावनेने जे त्याला सहज बोलिती ४९२

दानांत सर्व उत्कृष्ट असे सहजदान ते
देऊनि शिवज्ञानास जन्मरोगास नाशिते ४९३

शंकरा शिवभक्तांस दिले जे भक्तिपूर्वक
उत्कृष्ट दान जाणावे जगी सहजदानचि ४९४

अर्पिता एक सत्पात्रा हेममुद्रा सहस्र त्या
लाभे जे फल ते लाभे शिवास फूल अर्पिता ४९५

शिवचि पात्र सर्वस्वी विद्यानिधी जगद्गुरू
करिता त्यास ते दान अनंत फलदायक ४९६

शिवयोगीहि प्रत्यक्ष ज्ञानाब्धी शिवरूपचि
त्यास सहज दिलेले दान अनंत ते फळे ४९७

सत्पात्र दुसरा नाही कोणीही जंगमाविण
शास्त्रेचि बोलिती ऐसे तेणे सत्पात्र तो खरा ४९८

प्रशांत शिवयोग्यासी दिलेला घास एकचि
देई ते पुण्य लाभेना करिता यज्ञ कोटिही ४९९

तृप्तता शिवयोगी तो होतो तृप्तचि शंकर
तृप्तता शिव तद्रूप तृप्त होते चराचर ५००

प्रयत्ने सर्व कोण्याही कार्यामध्येहि सर्वदा
जंगमा तोषवावेचि अन्नधनादि अर्पुनी ५०१

सर्वस्व परशिवात ज्याचे झाले समर्पित
तोचि सहजदानी नि असे स्वयेचि शंकर ५०२

पक्व सहजदानी तो इच्छिना ब्रह्मसंपदा
असा विरक्त होताच माहेश्वरचि बोलिती ५०३

**अंगस्थलांतर्गत भक्तस्थल संपूर्ण**



## अंगस्थलांतर्गत माहेश्वरस्थल

### १६. माहेश्वरप्रशंसास्थल

होई सहजदानात भक्त निष्णात केवळ
पदांपासूनि ब्रह्मादी राहे होऊनि निःस्पृह ५०४

होता उत्कर्ष भक्तीचा वैराग्यमहिमेमुळे
विवेकी भक्त जो त्याला माहेश्वरचि बोलिती ५०५

देवांचा देव जो शंभू सर्वांत श्रेष्ठ तो असे
असा निश्चय बुद्धीत माहेश्वरचि जाण तो ५०६

मलांनी युक्त ब्रह्मादी तुळतीना शिवासवे
साहेना तुलना ज्याला माहेश्वरचि तो असे ५०७

ब्रह्मादी देव-प्राण्यांचा असे शंकर प्रेरक
मानितो श्रेष्ठ शंभूला माहेश्वरचि तो खरा ५०८

ब्रह्मादी देव मायेने वेष्टिले असती सदा
युक्त ते क्षयवृद्धीने मुक्ती द्याया अशक्त ते ५०९

नित्यमुक्त महादेव मुक्तिदाता समर्थ तो
असे जो जाणतो त्याला माहेश्वरचि बोलिती ५१०

तृणासमान संपत्ती देवांची क्षुद्र मानितो
विषयी शब्दस्पर्शादी निःस्पृह तो निरंतर ५११

परस्त्रीसंग टाळी जो वर्जितो परद्रव्यही
शिवकार्यात जो मग्न अभ्यासितो शिवागम ५१२

संतोषे शिवस्तोत्राने सदा पवित्र मानिती
वर्णिती शिवश्रेष्ठत्व ग्रंथ संग्रह ते करी ५१३

अहं ममत्व वर्जी तो पंचक्लेशांतुनी सुटे
मद मत्सर आवेग येऊ नेदी मनामधे ५१४

कामावेगातुनी मुक्त दूर क्रोधादि पासुनी
सदासंतुष्ट सर्वही प्राणिहितामधे रत ५१५

शिवकार्यविरोधाचे करी सर्व निवारण
शिवस्तुती करी त्याची करी संगत सर्वदा ५१६

शिवोत्कर्ष करायाला प्राणत्यागास उत्सुक
शिवैकनिष्ठ सर्वात्मा माहेश्वरचि वीर तो ५१७

## १७. लिंगनिष्ठास्थल

निष्ठा लिंगावरी गाढ नसेचि मान्य त्यागणे
पडता संकटी प्राण त्यागिना लिंग निश्चये ५१८

बुडाली सर्व संपत्ती जरी शिरहि छेदिले
माहेश्वर न सोडी तो लिंगपूजामहाव्रत ५१९

प्रसाद सेवितीना जे लिंगपूजेविना कधी
वसे करतली त्यांच्या मोक्षलक्ष्मीच सर्वदा ५२०

मोक्ष प्रत्यक्ष देई जो धर्म लिंगार्चनात्मक
असता अन्य धर्मांचे कशासाठी प्रयोजन ५२१

अन्नादी अर्पुनी लिंगा निजदेहास पोषिती
नित्य तेचि महामाहेश्वर नामे प्रशंसिले ५२२

सुस्थिर मन लिंगात ज्यांचे सदैव राहते
नेच्छिती स्वर्गादी काही प्रत्यक्ष शिवरूप ते ५२३

लिंगात मन तल्लीन वाणी स्तुतीमधे रमे
रमती हस्त पूजेत जाण तो रुद्र निश्चित ५२४

नसे कारण कर्मांचे लाभे स्वर्गादि ज्यामुळे
लाभतो शिव त्यांनाचि शास्त्रेही सर्व बोलिती ५२५

रुद्राक्षभस्मधारी नि अनन्यलिंगनिष्ठ जो
ब्रह्मादी देव तोषूनि सदा त्याला प्रशंसिती ५२६

## १८. पूर्वाश्रयनिरसनस्थल

लिंगाचाराविरोधी जे पूर्वाचरण प्राकृत
त्यागावे पूर्ण ते लिंगनिष्ठ माहेश्वरे सदा ५२७

पूर्वजातीतली कर्मे लिंगनिष्ठाविरोधक
त्यागी सर्व म्हणूनि तो पूर्वाश्रयनिरासक ५२८

लाभता शिवदीक्षा तो जाहला लिंगनिष्ठचि
प्राकृताचरणाचे ते काय त्याला प्रयोजन ५२९

शिवसंस्कार होताचि उरेना प्राकृती रुची
शिवधर्मात जे मग्न अशा माहेश्वरा-मनी ५३०

भेद दोन मनुष्यांचे विशुद्ध आणि प्राकृत
विशुद्ध शिवसंस्कारी संस्कारहीन प्राकृत ५३१

वर्णाश्रमादि धर्मांच्या व्यवस्था दोन सांगती
शिवाने कथिली एक ब्रह्म्याने कथिली दुजी ५३२

शिवैकनिष्ठ भक्तास शिवाचारचि योग्य ते
अन्य जनांस ब्रह्म्याने बोलिला योग्य सांगती ५३३

शिवसंस्कार होताचि जातिभेद उरेचिना
अग्नीत जाळिली काष्ठे रूपाने नच वेगळी ५३४

तैसेचि शिवभक्ताने सर्व सायासपूर्वक
शिवभक्तांमध्ये जातिभेद मानू नये कधी ५३५

## १९. सर्वाद्वैतनिरसनस्थल

शिव-भक्तांमधे शोभे संबंध पूज्य-पूजक
अद्वैत मानिता त्यात पूजाव्यापार थांबतो ५३६

अद्वैत मानिता लिंगनिष्ठाचि भंगते तिथे
व्हावे माहेश्वरे तेणे सर्वाद्वैतनिरासक ५३७

शिव प्रेरक मानावा आपणा प्रेर्यही तसे
अशा भेदेचि पूजावे माहेश्वरे शिवा सदा ५३८

असे पती महादेव जीव पशूसमान ते
स्वामि-भृत्यांत मानावा सांगा अभेद तो कसा ५३९

गुरुबोधे मिळे शंभू लाभे अद्वैत तेधवा
तोवरी द्वैतभावाने वर्तावे दृढ निश्चये ५४०

भेदामुळेचि पूजादी कर्मेही घडती सदा
म्हणूनि लिंगनिष्ठाने अद्वैत आचरू नये ५४१

शिव मी एक मानिता पूजाव्यापार खंडतो
अद्वैतासक्त होऊनि लिंगपूजा न टाळणे ५४२

## २०. आह्वाननिरसनस्थल

रत लिंगार्चनी शुद्ध सर्वाद्वैतनिरासके
शिवास इष्टलिंगात आवाहन नये करू ५४३

दिले शिवकलायुक्त गुरूने लिंग जेधवा
तेव्हापासूनि लिंगात जाणावे वसतो शिव ५४४

संस्कारयुक्त लिंगात सदैव शिव राहतो
आवाहन जरी केले अयोग्य जाण निश्चित ५४५

लिंगामध्ये करू नये आवाहन-विसर्जन
लिंगपूजक भक्ताने असे हा शास्त्रनिर्णय ५४६

## २१. अष्टमूर्तिनिरसनस्थल

शिव-जीवांतले ऐक्य माहेश्वरा अमान्य ते
तसे पृथ्व्यादि भूतांत पाहेना शिव तो कधी ५४७

पृथ्व्यादी अष्टमूर्तींत अधिष्ठाता असे शिव
जसा देही वसे आत्मा तसा मूर्तींत शंकर ५४८

पृथ्व्यादी सर्व संसार शिवाचे कार्य जाण ते
कर्ता-कार्य असे भिन्न जसा कुंभार-मृद्‌घट ५४९

पृथ्व्यादी आत्मपर्यंत प्रपंच अष्टधा असे
देह-देही असा भाव वसे जीव-शिवांत तो ५५०

पृथ्व्यादी अष्टमूर्तींच्या पासूनि शिव वेगळा
भाव दृढ असा तोचि अष्टमूर्तिनिरासक ५५१

## २२. सर्वगतनिरसनस्थल

मानिता शिव सर्वत्र करावे विश्वपूजन
लागेल म्हणुनी त्याला सर्वव्यापी न मानिती ५५२

जरी व्यापक सर्वत्र तरी आश्रय लिंगचि
राहतो इष्टलिंगात पूजावे जाणुनी असे ५५३

सर्व वृक्षी वसे अग्नी आधिक्याने शमीमधे
तसा शिव विशेषत्वे इष्टलिंगात राहतो ५५४

मानिले सर्व शास्त्रांनी शिवाचे सर्वगत्व ते
पूजेसाठी परि राहे इष्टलिंगी विशेष तो ५५५

लिंगरूपी तुझी शंभो तनू निर्दोष मंगल
लिंगी प्रकाशतो ऐसे श्रुती सर्वत्र वर्णिती ५५६

म्हणूनि इष्टलिंगात पाहावा शिव सर्वदा
अन्य स्थानी नये पाहू पुजू ध्याऊ कदापिही ५५७

सर्वव्यापी शिवाला जो लिंगाठायीच पाहतो
पूजितो तोच जाणावा सर्वगत्वनिरासक ५५८

## २३. शिवजगन्मयस्थल

नियंता सर्व विश्वाचा वसे लिंगी सदाशिव
पूजिता लिंग मानावे असे व्यापक हे जगी ५५९

झाले शिवातुनी विश्व नसे त्याहूनि भिन्न ते
नसेचि वेगळी जैसी मातीपासूनि घागर ५६०

फेस लाटा समुद्राशी वस्त्र तंतूसवे जसे
अभिन्न जग तैसेचि शिवाशी एकरूप ते ५६१

ताणले वस्त्र तंबूचा करी आकार धारण
तसे शक्तिविकासाने विश्वरूपात शंकर ५६२

सर्परूप दिसे दोरी विश्वरूप तसा शिव
चराचरचि संपूर्ण शिवरूपचि निश्चये ५६३

तस्कर वृक्षबुंध्यात चांदी शिंपीत भासते
वाळूत जल मेघात दिसे गंधर्वपूर ते ५६४

तसे आनंद-सद्रूप-चिद्रूप शंकरामधे
समस्त विश्वसंसार अभिन्नत्वे विराजतो ५६५

पर्ण फांद्या अशा रूपे जसा वृक्ष उभा दिसे
तसा भूम्यादि रूपाने विराजे शिव एकचि ५६६

## २४. भक्तदेहिकलिंगस्थल

अंतरात्मा समस्तांचा शिव प्रपंचरूप जो
हृत्कमलात भक्तांच्या प्रकाशतो निरंतर ५६७

मंदराचल-कैलासी मेरूमध्ये हिमालयी
तसा भक्तमनी नित्य विशेषत्वे विराजतो ५६८

शिव व्यापक सर्वत्र तरी देहांत भासतो
परिच्छिन्न तसा राहे भक्तांतरीहि सर्वदा ५६९

लिंगरूपी तुझा रुद्रा देह निर्दोष मंगल
भक्तांतरी प्रकाशे तो सांगती श्रुति सर्वही ५७०

शुद्ध विरक्त सुज्ञानी रुद्राक्षभस्मयुक्त जे
राहतो अंतरी त्यांच्या सप्रेमे शिव सर्वदा ५७१

नित्य संतुष्ट निष्पाप शिवज्ञानपरायण
माहेश्वरांतरी नित्य शिव स्पष्ट प्रकाशतो ५७२

पूजितो इष्टलिंगास शिव विश्वात पाहतो
माहेश्वरचि तो एक प्रसादी होतसे पुढे ५७३

**अंगस्थलांतर्गत माहेश्वरस्थल संपूर्ण**



# अंगस्थलांतर्गत प्रसादिस्थल

## २५. प्रसादमाहात्म्यस्थल

लिंगाचारामुळे ज्याची नष्टली सर्व पातके
प्रसन्नचित्त जो झाला प्रसादी त्यास बोलिती ५७४

नैर्मल्य पूर्ण चित्ताचे त्याला प्रसाद नाव हे
प्रसाद सिद्ध होतो हा जाण शंभुकृपेमुळे ५७५

शिवास अर्पिले जे जे असे शिवप्रसाद तो
ठरे निर्माल्य शैवांच्या चित्तशुद्धीस कारण ५७६

घेता शिवप्रसादास चित्त निर्मल होतसे
ठरे निर्मलता तीच शिवज्ञानास कारण ५७७

शुद्धान्न सेविता होती तत्त्वे सर्वहि शुद्ध ती
लिंगास अर्पिले अन्न तेचि शुद्धान्न बोलिले ५७८

प्रसाद सेवितो नित्य भक्त लिंगपरायण
लाभे प्रसन्नता त्याला असे जी ज्ञानकारण ५७९

उपभोगार्थ जे काही संपादिले पदार्थही
अर्पूनि इष्टलिंगास करावे नित्य सेवन ५८०

नित्यसिद्ध महादेव संसाररोग नाशितो
प्रसाद औषधी त्याची जन्मव्याधिनिवारक ५८१

प्रसाद सेविता चित्तशुद्धी आरोग्यही मिळे
त्रिताप नाशिती आणि शुद्ध विद्याही लाभते ५८२

संकटे नष्टती सर्व ज्ञानाचे द्वार मोकळे
वाढे वैराग्यसंपत्ती दाटे आनंद मानसी ५८३

असे दुर्लभ पाप्यांना पुण्यवंतास लभ्य तो
करावा शिवभक्तांनी नित्य प्रसाद सेवन ५८४

फूल पान फळे पाणी शिवा अर्पूनि सेविता
नाशिती त्या प्रसादाने भक्तांची सर्व पातके ५८५

प्रसादान्न शिवाचे ते भक्त स्वीकारितो जसे
श्रीगुरु-जंगमांचेही स्वीकारावे तसेचि ते ५८६

## २६. गुरुमाहात्म्यस्थल

सर्वथा मोक्षसिद्धीस असे श्रीगुरू कारण
राहतो गुरुरूपाने महादेव उपस्थित ५८७

निराकार महादेव नित्य तो ज्ञानसागर
अनुग्रह करायासी गुरुरूपात येतसे ५८८

शिव तोचि गुरू आणि गुरू तोचि असे शिव
ज्ञानवंते नये मानू दोघांसी वेगवेगळे ५८९

हस्तपादादि अंगांनी दिसे सामान्य तो जरी
तरी सामान्यांप्रमाणे त्यास मानू नये कधी ५९०

सामान्य मानिता त्याला प्राप्त नव्हेचि श्रेयस
लाभाया मोक्ष पूजावे एकाग्रचित्त होउनी ५९१

गुरूची न घडे भक्ती शिवाचीही घडेचिना
शिवासमान पूजावे म्हणूनि श्रीगुरूसही ५९२

## २७. लिंगमाहात्म्यस्थल

रुजता गुरुमाहात्म्य होता स्वरूपज्ञानही
माहात्म्य ज्ञात लिंगाचे होते उत्कृष्ट तेधवा ५९३

शिवाच्या बोधलिंगाचे ज्ञान होई गुरूमुळे
लिंग ते सर्व विश्वाचे असे कारण निश्चित ५९४

पवित्र लिंग चिन्मात्र स्वतंत्र ब्रह्म निर्मल
शिवनामक सद्रूप आनंदरूप शाश्वत ५९५

सर्वकारण लोकांचे असे वेदांस कारण
पूर्ण ते सर्व तत्त्वांनी संसारातूनि तारिते ५९६

ज्योतिर्मय वसे नित्य योग्यांच्या अंतरांत ते
प्रमाणातीत लाभेना कोणा गुरुकृपेविना ५९७

नेणती विष्णु-ब्रह्मादी ज्योतिस्वरूप लिंग ते
अन्य लोक कसे त्याचे जाणतील स्वरूपही ५९८

लागेना बहु सांगावे लिंग ते ब्रह्म शाश्वत
होती विलीन ज्याच्यात योगी लिंगचि जाण ते ५९९

पीठिका शक्ति साक्षात पिंडी शिवचि जाण तो
शिव-शक्तिमयी विश्व लिंग त्यालाच बोलिती ६००

ब्रह्मादी सर्वही देव शौनकादी मुनीश्वर
शिवपूजेमुळे झाले आपापल्या पदी स्थिर ६०१

लिंगरूप महादेव विश्वचालक तो असे
अन्य त्यासारखा देव नसेचि सांगती श्रुती ६०२

## २८. जंगममाहात्म्यस्थल

गुरु-शिष्यांतल्या लिंगमाहात्म्यसंपदेहुनी
चिद्रूप विश्व जो जाणे असे तो श्रेष्ठ जंगम ६०३

प्रकाशे विश्व तो शंभू नांदतो अंतरी असा
ठेविती भाव जे दृढ बोलिती त्यांस जंगम ६०४

त्रिमलांपासुनी मुक्त आत्म्यात पाहती जग
शिवयोगबळे त्यांना शिवयोगीच नाव ते ६०५

घोर संसार-अंधार निवारी शिवज्ञान जे
वसे ते अंतरी ज्यांच्या शिवयोगीच जाण ते ६०६

जिंकिले कामक्रोधादी मोहग्रंथीहि छेदिली
पाषाण-मृत्तिका-सोने मानिती सम सर्वही ६०७

समान मित्र-शत्रूही शिवानुभाव प्राप्त जे
नि:स्पृह निरहंकारी शिवयोगीच जाण ते ६०८

शिवध्यान शिवज्ञान दुर्लभ जगती असे
दोन्ही असे जयापाशी प्रत्यक्ष शिवरूप ते ६०९

गृही ज्या शिवयोग्याची पायधूळ पडे कधी
पुण्यक्षेत्रचि जाणावे गृह ते पुण्यपावन ६१०

दर्शने शिवयोग्याच्या सिद्धी समस्त लाभती
स्पर्शिता पापमुक्ती नि पूजिता मुक्तिलाभही ६११

शिवानंदी रमे आणि शिवरहस्य जाणतो
तत्संपर्के न लाभे ते फळ जगात कोणते ६१२

## २९. भक्तमाहात्म्यस्थल

शिवयोगी गुरू लिंग पूजितो यांस भक्त तो
तेणे सिद्धचि माहात्म्य भक्ताचे होय निश्चित ६१३

कायावाचामनाने जे पूजिती नित्य शंकर
शिवध्यानात जे मग्न भक्त त्यांनाच बोलिती ६१४

तारी भवभयातूनि भक्ती ती अतिदुर्लभ
स्थिर ज्याच्या हृदी तोचि जाणावा भक्त उत्तम ६१५

वेदशास्त्रे तपे यज्ञे आचरावी कशास ती
जन्मरुग्णास शंभूची घडे भक्तीच ना जरी ६१६

शिवभक्तिविना केले होते पुण्यहि निष्फल
लाभले फल दक्षाला यज्ञाचे विपरीत ते ६१७

पातकी शिवभक्तीने होई अत्यंत शुद्ध तो
पितृघ्न चंड भक्तीने पूर्वी उद्धरिला जसा ६१८

पाप पुण्य शिवेनाच शिवभक्ता कदापि ते
भक्तिहीनचि गुंते तो कर्मबंधी निरंतर ६१९

राहे शिवाश्रयी जीव कर्मलेश नसे तया
सूर्य-अश्वांस अंधार भिववीना कधी जसा ६२०

बांधाया शिवभक्तांस शक्ती न कर्मबंधनी
मत्त हत्तीस बांधील कैसी कमलशृंखला ६२१

असो ब्राह्मण क्षत्रिय वैश्य अंत्यज वा कुणी
शूद्रही शिवभक्तीने मान्य शिवासमानचि ६२२

जागता शिवभक्ती ती नुरेचि जातिकल्पना
अग्नीत दग्धली काष्ठे अग्निरूपचि ती जशी ६२३

आचरूनि शिवाचार फले शंभूस अर्पिती
मग्न शिवार्चनी झाले तेचि जाणा गणेश्वर ६२४

## ३०. शरणमाहात्म्यस्थल

जाणूनि गुरुलिंगादी मानिती शिव रक्षक
जाती शरण शंभूस त्यांना शरण बोलिती ६२५

ऐश्वर्य त्यागुनी ब्रह्माविष्णूचे क्षणभंगुर
शिवा शरण जाती त्या स्थला शरण बोलिती ६२६

रक्षितो सर्व भूतांस असे शरण्य शंकर
त्याला शरण निष्ठेने जाई तो शरणागत ६२७

भोगासक्तीतुनी मुक्त पूजिना अन्य देव ते
मागतो मोक्ष शंभूला शरणार्थीच तो असे ६२८

कायावाचामनाने जे शंभूला शरणागत
यज्ञयागादि कर्मांचे नसे त्यांना प्रयोजन ६२९

यज्ञामुळे मिळे स्वर्ग क्षयाने युक्त जो असे
शिवा शरण जाताचि लाभते फल अक्षय ६३०

कल्पवृक्ष महादेव त्याला शरण जाय जो
जरी पापी तरी त्याला लाभे न कोणते फल ६३१

शिवभक्ती मनी जागे जन्म त्याचाच तो खरा
जन्मती मरती अन्य त्यांचे जन्मचि व्यर्थ ते ६३२

दुर्लभ मानवी जन्म ज्ञानसाधन निश्चित
जन्मूनि नेणती शंभू त्यांचा जन्म निरर्थक ६३३

ज्याचे शिवात संपूर्ण रंगले चित्त सर्वदा
झाले जीवन-वंशाचे त्याच्याच सर्व सार्थक ६३४

## ३१. शिवप्रसादमाहात्म्यस्थल

लाभे शिवप्रसादाने विशेषानुभवस्थिती
सांगेन महती त्याची असे जो मोक्षदायक ६३५

लिंगैकनिष्ठ जे शुद्ध गुरुपूजेत तत्पर
प्रसन्न सर्वदा त्यांच्यावरी असे महेश्वर ६३६

संसारताप जीवांचा निवृत्त होय ज्यामुळे
तोचि प्रसाद शंभूचा असे दुर्लभ या जगी ६३७

मंत्रयज्ञतपस्यादी ध्यानज्ञानादि सर्वही
करावे लागती नित्य प्रसादास्तव निश्चित ६३८

भक्ती अनन्य सर्वांना प्रसादानेचि लाभते
प्रसादहीनास लाभेना शिवभक्ती कदापिही ६३९

गर्भस्थ जन्म घेणारा जन्मलेला असो कुणी
विप्र अंत्यजही होतो प्रसादे मुक्त तत्क्षणी ६४०

ब्रह्मादी देवता सर्व स्वस्थानी स्थिर राहुनी
प्रसादसेवनानेचि जाहल्या नित्यसिद्ध त्या ६४१

प्रसाद सिद्ध होताचि परमानंदकारण
शिवरूप दिसे विश्व यात नसेचि संशय ६४२

भ्रमाया भवचक्रास असे कर्मचि कारण
प्रसादाविण ते कर्म निवृत्त होइना कधी ६४३

सांगावे बहु ते काय प्रसादाएवढे जगी
सम अधिक काहीच नसे नसेचि निश्चित ६४४

लाभे शिवप्रसादाने समाधी शिवयोग ती
त्रिलोकी त्यामुळे सर्व दिसे शिवचि संचला ६४५

शिव-विश्वांत अद्वैत ज्याच्या दृष्टीत संचले
प्रसादीस पुढे प्राणलिंगी नामे प्रशंसिती ६४६

**अंगस्थलांतर्गत प्रसादिस्थल संपूर्ण**



# अंगस्थलांतर्गत प्राणलिंगिस्थल

## ३२. प्राणलिंगिस्थल

पूजाकर्मांमुळे भक्त प्रसादिस्थल गाठतो
ज्ञानयोगामुळे प्राणलिंगी त्यालाच बोलिती ६४७

चिद्रूप ब्रह्म ते लिंग चिच्छक्ती प्राणरूपिणी
लिंगविज्ञान हे जाणे प्राणलिंगीच तो असे ६४८

अपाना स्पर्शिता प्राण ज्योत नाभीत जन्मते
प्राणलिंग तिला नाव शिवयोगीच सांगती ६४९

धुके लीन उन्हामध्ये तसा ज्योतीत प्राणही
पावतो लय त्यालाच बोलिती प्राणलिंग हे ६५०

दीप तेवे तसे लिंग भाविती अंतरी मुनी
अज्ञ प्राकृत लोकांस जाणवेनाच ते कधी ६५१

ज्योतिस्वरूप लिंगास अंतरातील सोडुनी
पूजिती बाह्यलिंगास जाणावे मूढ ते अती ६५२

बाह्य लिंगार्चनेहूनि राखे स्वत:स वेगळा
अंतर्लिंगात आसक्त प्राणलिंगीच तो खरा ६५३

मायानिर्मित हे विश्व सर्वदा त्याज्य मानितो
लीन चिद्रूप लिंगात प्राणलिंगी असे सदा ६५४

अहमस्मि अशी स्फूर्ती प्राणशक्तीच जाण ती
शक्तिसवे अहंबोध जाणावे प्राणलिंग ते ६५५

## ३३. प्राणलिंगार्चनस्थल

चिद्रूप प्राणलिंगास भावपुष्पे समर्पिता
प्राणलिंगार्चना तीच शिवागमज्ञ सांगती ६५६

रोधिता नवद्वारांना अंतरी सूक्ष्म जी दिसे
चंद्रामृतात न्हालेली प्राणाने व्याप्त ज्योत ती ६५७

विराजे हृदयाकाशी ज्ञानदीपे प्रकाशते
प्राणलिंग पुजावे ते भावफुले समर्पुनी ६५८

क्षमेचे जल अर्पावे विवेकवस्त्रही तसे
दागिना सत्य वाचेचा विरक्ती पुष्पमाळ ती ६५९

समाधिस्थिति हा गंध निरहंकार अक्षता
लावावा धूप श्रद्धेचा ज्ञानाचा दीपही तसा ६६०

भ्रांतिनिवृत्ति नैवेद्य घंटानिनाद मौन ते
विषयार्पण तांबूल अर्पावा भक्तिपूर्वक ६६१

त्यागिणे विषयभ्रांती जाणावी ती प्रदक्षिणा
लिंगाकारचि बुद्धी ती नमस्कारक्रिया असे ६६२

असे भावफुलांनीच पूजावे नित्य लिंग ते
एकचित्ते असे हीच प्राणलिंगार्चना खरी ६६३

## ३४. शिवयोगसमाधिस्थल

प्राणलिंगार्चनेमध्ये रमे तो भक्त अंतरी
शिवैक्यध्यानसंपत्ती समाधी तीच सांगती ६६४

सच्चिदानंदरूपी तो सर्व तत्त्वांपलीकडे
वर्णिता ये न वाचेसी आतुडेना मनासही ६६५

प्रकाशे सर्व विश्वाला प्रमाणांसी अगोचर
उमाशक्तीमुळे भासे विश्वी चैतन्यरूप जो ६६६

हंसरूप शिवाला त्या सोऽहं रूपात पाहतो
तादात्म्य चिंतितो तीच असे समाधि निश्चित ६६७

महालिंग परब्रह्म जीवात्मा प्राण जाण तो
एकत्व पाहतो त्यात समाधिनिष्ठ तो खरा ६६८

जीव-शिवांस आधार अशा देहात सूक्ष्म त्या
विराजती सहा चक्रे ध्यावी ती लक्षपूर्वक ६६९

भ्रूमध्यापासुनी ऊर्ध्व भागी सहस्रचक्र ते
केशाग्रासारखे तेथे ब्रह्मरंध्र विराजते ६७०

कैलासस्थान त्या ठायी राहतो शिव निश्चित
असे सांगती विद्वान योगविद्याविशारद ६७१

जाणूनि ती सहा चक्रे करावे शिवचिंतन
अभेदभाव ठेवूनि सर्व चक्रांत निश्चये ६७२

विकल्पे भरले विश्व बाह्यदृष्टीस जाणवे
अंतर्दृष्टीस योग्याच्या शिवानंदेचि भारले ६७३

अरणीवर आत्म्याच्या घासता शिवज्ञान ते
शिवाद्वैताग्नि तेजस्वी भक्तमनात जन्मतो ६७४

समस्त मलमायादी जाळावी त्यात बंधने
जाणूनि आत्मरूपास व्हावे विलीन त्यामधे ६७५

पर्णांनी पंचक्लेशांच्या युक्त संसारवृक्ष हा
शिवभावकुठाराने छेदावे त्यास लागते ६७६

अज्ञानदैत्य संसाररात्रीत मातले अती
लोपले आत्मरूपाचे ज्ञान त्यांच्यामुळे जगी ६७७

संसाररात्र नाशाया शिवध्यानचि भास्कर
मनी उदित होताचि फाके प्रभात जीवनी ६७८

## ३५. लिंगनिजस्थल

अंतरी लिंग सुस्थिर असे प्रत्यक्ष जाणतो
तोचि लिंगनिजस्थली असे विद्वान सांगती ६७९

ब्रह्मा विष्णू तसे वेद जेथे विलीन सर्वही
ज्यातूनि जन्मती पुन्हा तेचि ब्रह्म सनातन ६८०

संभवे विश्व ज्यातूनि चिद्रूप शिव जाण तो
विश्व हे रूप त्याचेच अन्य काही नसेचि ते ६८१

विश्वाधार जगद्स्फूर्तिरूप शिवचि लिंग तो
निजलिंगचि तो ऐसे वर्णिती बुद्धिवंतही ६८२

नच भानू प्रकाशे न अग्नी विद्युल्लता शशी
नक्षत्रेही महालिंग प्रकाशता तयापुढे ६८३

शिवात्मक महालिंग असे स्वयंप्रकाशित
प्रकाशितचि तेजाने त्याच्या होती न संशय ६८४

विश्व उत्पन्न ज्यातूनि राहते स्थिर ज्यात ते
पावते लय ज्याच्यात लिंगतत्त्वचि श्रेष्ठ ते ६८५

सच्चिदानंद लिंगास मानितो निजरूप जो
करिता ध्यान होई तो निजलिंगात तन्मय ६८६

## ३६. अंगलिंगस्थल

शिवज्ञ जीव तो अंग लिंग ते ब्रह्म शाश्वत
दोहोंस जाणतो अंगलिंगी त्यालाच बोलिती ६८७

अंगात लिंग लिंगात अंग असे उपस्थित
जाणतो हे असे तोचि अंगलिंगीच निश्चये ६८८

ज्योतिस्वरूप लिंगाचे अंतरी ध्यान जो करी
सद्भावे पूजितो नित्य अंगलिंगीच तो असे ६८९

लिंग हेचि परब्रह्म शास्त्रेही सर्व सांगती
त्रैलोक्याधार मोक्षाचे रूप प्रत्यक्ष ते असे ६९०

अशी दृढ मनी ज्याच्या वसे नित्यचि धारणा
देहधारी असूनी तो जाणावा मुक्त निश्चित ६९१

जगत्कारण चिल्लिंग उत्पत्तिनाशशून्य जे
त्यास जे नेणती मूढ नच मोक्षास पात्र ते ६९२

प्राणलिंगार्चनी युक्त आत्मा शिवास मानितो
पक्व ज्ञानामुळे तोच स्थली शरण जातसे ६९३

**अंगस्थलांतर्गत प्राणलिंगिस्थल संपूर्ण**



# अंगस्थलांतर्गत शरणस्थल

## ३७. शरणस्थल

अंगलिंगी सती आणि पती शिवास मानुनी
भोगी जो सुख ऐक्याचे त्याला शरण बोलिती ६९४

एकनिष्ठ शिवाविषी पतिव्रतेसमान तो
अन्याकडे न पाहेचि तेणे शरण तो असे ६९५

सर्वश्रेष्ठ महादेव असे जो जाणतो स्वये
द्रव्यनिधी मिळे ज्याला मागेल काच तो कसा ६९६

लाभे ज्याला शिवानंद इच्छिना अन्य देवता
गंगाजलास त्यागूनि इच्छी मृगजळा कसा ६९७

संसारतम छेदाया समर्थ शिवभास्कर
अन्य ते काजवे देव कामी येतील ते कसे ६९८

संसारतप्त जीवांना ब्रह्मादी फल नेदिती
लक्षी चकोर चंद्रास न पाहे अन्य तारका ६९९

शिव रक्षक सर्वांचा आलेल्या शरणागत
दंशले भवसर्पानि हरितो विष सर्वही ७००

शिवानंद मनी ज्याच्या परिपूर्ण प्रकाशला
अन्य सुखांत योगी तो काही केल्या रमेचिना ७०१

म्हणूनि सर्वसायासे जावे शरण शंकरा
त्या सुखे जो सुखी झाला अन्य चिंती न देवता ७०२

## ३८. तामसनिरसनस्थल

शिवनिष्ठ परानंदे झाला संतुष्ट पूर्ण जो
निवारी तम तेणेचि ठरे तामसवर्जक ७०३

तमाने ग्रासले ज्ञान देई न सद्‌गती कधी
शुद्ध सत्त्वगुणानेचि साधितो ज्ञानयोग तो ७०४

विवेक शम वैराग्य क्षमा नि पूर्णभावना
दम कारुण्यसंपत्ती श्रद्धाही सत्यनिर्मित ७०५

शिवभक्ती शिवाचार गुण हे ज्ञानबांधव
या गुणे युक्त जो योगी तोचि सात्त्विक बोलिला ७०६

काम क्रोध महामोह मद मत्सर हे गज
शिवज्ञानमृगेंद्राच्या तिष्ठतील पुढे कसे ७०७

रजोगुणे करी द्वेष विश्वाचा शिवरूप जे
जिथे तिथे शिवद्वेषी जाणावा तोचि निश्चित ७०८

प्राणिद्वेष्टा अहंभावे फुगला सर्वकाळ जो
असत्य बोलतो तोचि जाणावा नर तामस ७०९

उत्पन्नले तमाने जे रागद्वेषादि वृक्ष ते
शिवज्ञानकुठाराने छेदावे ते निरंतर ७१०

सूर्यासमान तेजस्वी जागता शिवज्ञान ते
शिवयोग्यास स्पर्शेल तमोविकार तो कसा ७११

## ३९. निर्देशस्थल

निरसूनि तमोभाव भवाचे मूळ कारण
गुरू निर्देशिती ज्ञान त्यास निर्देश बोलिती ७१२

सूर्याविण जगी कोणी जसा अंधार नाशिना
गुरूविण प्रकाशेना शिवतत्त्व तसे कुणी ७१३

जसा वैद्याविना रोग होईना दूर तो कधी
संसाररोग नाशेना तसा ज्ञानी गुरूविना ७१४

झाला मलिन अज्ञानधुळीने चित्तदर्पण
ज्ञानविभूति घासूनि करिती शुद्ध श्रीगुरू ७१५

जीवन्मुक्त शिवज्ञानी गुरुकृपाकटाक्ष तो
लाभता मग विश्वात असे दुर्लभ काय ते ७१६

श्रीगुरू करुणासिंधू कैवल्य-कल्पवृक्ष तो
जगी दुर्लभ अत्यंत शिवाद्वैतपरायण ७१७

क्षीरसागर सिंधूंत पर्वतांत सुमेरू तो
सूर्य नवग्रहांमध्ये जसा रत्नांत कौस्तुभ ७१८

जसे चंदन वृक्षांत देवांत श्रेष्ठ शंकर
शिवज्ञानी गुरू तैसा श्रेष्ठ गुरूंत लौकिक ७१९

## ४०. शीलसंपादनस्थल

जागते शिवजिज्ञासा गुरुबोधे मनात जी
शील ती बाणली अंगी शीली त्यालाच बोलिती ७२०

शरणांचे हरी क्लेश शिवब्रह्म महान जे
स्थिर चित्त तयाठायी ठेवणे शील हे असे ७२१

सर्वोत्तम शिवज्ञान मानणे ध्यानमग्नता
शिवोत्कंठा असे शील असे तो शीलवंतही ७२२

अन्य शंभुहुनी देव त्यांचे न घेइ ज्ञान जो
शिवासक्त मनोवृत्ती शीलवंतचि तो असे ७२३

सतीचे पतिप्रेमात शील जाणवते जसे
तसे दृढ शिवाठायी भक्ताचे शील जाणवे ७२४

सेवी पतीविना अन्य पुरुषा निंद्य ती सती
निंद्य शरण तैसाचि सेविता अन्य देव ते ७२५

शिवज्ञानावरी निष्ठा दृढ ते शील मानिती
शील अंगी असे ज्याच्या बोलिती शीलवान तो ७२६

दृढ लिंगांगज्ञानी जो पती शिवास मानितो
शीलालंकार संपन्न ऐक्यस्थलात पोचतो ७२७

**अंगस्थलांतर्गत शरणस्थल संपूर्ण**



# अंगस्थलांतर्गत ऐक्यस्थल

## ४१. ऐक्यस्थल

भोगितो शिवानंदास प्राणलिंगार्चनेमुळे
तोचि शरण लिंगाशी होतसे ऐक्य पूर्णत: ७२८

निरिच्छ विषयांमध्ये अंतरी शुद्ध पूर्ण जो
डुंबे शिवसुखाब्धीत ऐक्य त्यालाच बोलिती ७२९

निष्कलंक त्रिमलांच्या पासूनि मुक्त जाहला
ऐक्यस्थलात आरूढे शिवोऽहंभावनेमुळे ७३०

शिवाशी सच्चिदानंदरूपी जो ऐक्य होतसे
विश्ववैभव मायेने निर्मिले ते दिसेचिना ७३१

बुद्बुदासम ब्रह्मांडे तत्त्वे छत्तीस डोलती
आटे मायासमुद्र तो शिवैक्यवडवानली ७३२

मायाशक्तीमुळे जीव गुंते भेदांमधे सदा
तिचा विनाश होताचि उरेना भेद किंचित ७३३

पशू आणि पती भाव झाला मायाभ्रमामुळे
नाशिता भ्रम तो कैसा उरे पशू नि तो पती ७३४

भेदांच्या वारुळामध्ये संसारसर्प राहतो
अद्वैतभावना हीच त्यावरी औषधी असे ७३५

भेदबुद्धीतुनी घोर जन्मे संसारसागर
ऐक्यनौकेतुनी जातो तरूनि त्यात देशिक ७३६

अविद्येच्या तमी जन्मे संसारकाळरात्र ती
अद्वैतसूर्य येताचि नाशे ती कामप्रेरक ७३७

घोर संसारतापास कराया नष्ट पूर्णत:
अद्वैतभावनेवीण नसे दुजा उपायचि ७३८

शिवाद्वैतामुळे लाभे क्षणकाळात जे सुख
तेवढे कोटि वर्षांत मिळेना भोग भोगुनी ७३९

मनोवृत्तीत ब्रह्मांड ज्याच्या सामावले पुरे
सुखस्फूर्तीस त्याच्याच मुक्ती हे नाव साजते ७४०

## ४२. आचारसंपत्तिस्थल

शिवासी ऐक्य झालेला देहधारी जरी असे
आचरे सूतकादीही ठरेना त्यास बाधक ७४१

शिवज्ञान मनी स्थिर घडे सुकृत दुष्कृत
तरी ते न फळे काही असे अलिप्त त्याहुनी ७४२

सर्वत्र समदृष्टीने पाहे जगात शंकर
पुण्य वा पाप कर्मांचे पडेना फल भोगणे ७४३

पुण्यात्मा पातकी किंवा असो ब्राह्मण वा कुणी
शिवभाव मनी दृढ त्याला सर्व समानचि ७४४

वर्णाश्रमादि कर्मांचे नसे त्याला प्रयोजन
फलाशेविण कर्मे तो तरी सहज आचरे ७४५

विशुद्ध ज्ञान-अग्नीत कर्मबीजचि दग्धले
देहधारी परी त्याचा देहव्यापार लौकिक ७४६

संपन्न शिवज्ञानाने युक्त वैराग्यलक्षणे
होईना लिप्त तो कर्मे पद्मपत्र जसे जळी ७४७

चालला बैसला किंवा जागा असो कि झोपला
महाज्ञानी असे नित्य शिवपूजेत मग्न तो ७४८

दिसे समोर जे काही आनंदे त्यास पाहतो
शिवाचेचि घडे त्याला जगी सर्वत्र दर्शन ७४९

चिंतितो शुद्ध चित्ताने शिवरूपात सर्वही
तेणे चिंतन त्याचे ते जाहले शिवध्यानचि ७५०

योगी लोकांसवे काही स्वेच्छेने बोलतो तरी
बोलणे स्तोत्र शंभूचे जाणावे जाहले असे ७५१

घडती सर्व कर्मेही जाणता वा अजाणता
शिवपूजाच ती जाण शिवत्व लाभल्यामुळे ७५२

## ४३. एकभाजनस्थल

शिवरूपचि असे विश्व ऐसे एकाग्र भावितो
शिव आश्रय सर्वांचा जाण ते एकभाजन ७५३

शिव-लोक-स्वत:मध्ये पाहे एकत्व सर्वदा
तेणे ऐक्यमती स्थिर प्रसादास्तव होतसे ७५४

स्थित शिवामधे विश्व शिव सर्वत्र भासतो
आधार आणि आधेय असे संबंध त्यामधे ७५५

मनोवृत्तीत संपूर्ण जयाच्या शिव व्यापिला
मायानिर्मित जे त्याच्या येईना प्रत्ययास ते ७५६

प्रकाशे विश्व चैतन्ये नसे त्याविण वस्तुचि
मायानिर्मित वस्तूंचे नसे त्याला प्रयोजन ७५७

वृत्तिशून्य मने शिवाठायी जो लीन जाहला
जीवन्मुक्तचि योगी तो यात संशय कोणता ७५८

## ४४. सहभोजनस्थल

शिव-श्रीगुरु-शिष्यांस आत्मरूपात पाहणे
सर्वग्रासात्म हा भाव बोलिती सहभोजन ७५९

शिव-श्रीगुरु-विश्वाला मानूनि एकरूपचि
सदैव चिंतिणे तैसे स्थल हे सहभोजन ७६०

शिव हा हा गुरू आणि विश्व मी वेगळे अशी
भेदबुद्धी नसे त्याला बोलिती विश्वभोजक ७६१

भृत्य मी शिव स्वामी नि शिष्य मी गुरू वेगळे
अशी बुद्धी नसे तोच शिवाद्वैतपदी स्थिर ७६२

पराहंकार-अग्नीत भेदद्रव्यांस होमितो
विश्वहोमी असे त्याला गौरविती शिवागमी ७६३

मीच शिव गुरू मीच मीच विश्व चराचर
जाणीव जीमुळे होते पूर्णाहंताच ती असे ७६४

मायाभेद-हविर्द्रव्ये ज्ञान-अग्नीत होमितो
तो विश्वहविभोक्ता नि ज्ञानदीक्षित मानिती ७६५

चैतन्यरूप सूर्यात मनोवृत्ती विलीनल्या
जगाची बाह्य जाणीव त्याला होईल ती कशी ७६६

लिंगात अंग संपूर्ण पावले सामरस्य ते
तीच मुक्ती पराविद्या महात्मे सांगती असे ७६७

भक्तादी षट्स्थलांचे ह्या करी पालन भक्त जो
धनी निश्चित मोक्षाचा होतो शिवकृपेमुळे ७६८

**अंगस्थलांतर्गत ऐक्यस्थल संपूर्ण**



# लिंगस्थलांतर्गत भक्तस्थल

## ४५. दीक्षागुरुस्थल

नाशूनि भवपाशांस दीक्षा दे शिवज्ञानचि
दीक्षा जो देतसे त्याला दीक्षागुरू प्रशंसिती ७६९

गुकार हा गुणातीत रूपातीत रुकार तो
बोधी रूपगुणातीत शिवास जाण तो गुरू ७७०

शास्त्रार्थ बोधुनी शिष्याकडूनि करवूनि घे
स्वयेही आचरी तेणे आचार्य त्यास बोलिती ७७१

शिवैकनिष्ठ आचार्य तराया भवसागर
उपाय दाखवी तेणे संबोधिती जगद्गुरू ७७२

सर्व वस्तूंत चैतन्य भासे अखंड सर्वदा
ज्याच्या आत्मप्रभावे तो गुरू विश्वप्रकाशक ७७३

## ४६. शिक्षागुरुस्थल

शिष्यशंका करी दूर बोधूनि योग्य उत्तरे
शिष्यास शिकवी तेणे शिक्षागुरूच तो असे ७७४

बोध्य तो शिवसिद्धान्त असे बोधक श्रीगुरू
बोध्यबोधक-भावास बोधी शिक्षागुरूच तो ७७५

चांदणे शरदातील बोधवाक्ये तशी जणू
नाशिती भवरात्रीस तेणे आचार्य तो खरा ७७६

निवारी भ्रांति मायेची देतसे शिवज्ञानही
अद्वैतास करी दृढ आचार्यश्रेष्ठ तो असे ७७७

जाणूनि पूर्वपक्षांस सिद्धान्त प्रतिपादितो
खंडितो भेदवादांस तोच शिक्षागुरू खरा ७७८

छेदी संदेहवृक्षांस शुद्ध बोधकुठारिका
शोभे तोचि जगामध्ये श्रीगुरूंचा शिखामणी ७७९

विचारदर्पणामध्ये ज्याच्या सदैव बिंबली
मोक्षश्री तोचि जाणावा श्रीगुरू भवतारक ७८०

प्रकाशे ज्ञानतेजाने शिष्यांतरी स्वरूप ते
गुरूसमान ऐसा तो जगी होईल कोण तो ७८१

शिवज्ञानौषधी श्रेष्ठ निवारी भवरोग जो
असा शिक्षागुरू कोणा लाभे न शोधिता कुठे ७८२

## ४७. ज्ञानगुरुस्थल

शिवज्ञानरहस्यार्थ बोधी संदेहहारक
शिवासम शिवज्ञान देई ज्ञानगुरूचि तो ७८३

भेदशून्य निराकार चिदाकाशास दावितो
शास्त्रयुक्तीसवे तोचि ज्ञानगुरू प्रशंसिला ७८४

चंद्र वृद्धिक्षये ग्रस्त झाला दिसे कलंकित
ज्ञानचंद्र असे मात्र निर्विकार अलांछित ७८५

रत्नदीप करी दूर बाजूचे तम केवळ
ज्ञानदीप करी नष्ट तम सर्वत्र दाटले ७८६

भोग-मोक्षद ज्ञानाच्या उपदेशात तत्पर
ज्ञानाचार्य करी कृपा निजभक्तांवरी सदा ७८७

कृपाकटाक्षचंद्राने उधाणे ज्ञानसागर
संसारतम छेदी तो ज्ञानवंत गुरू असे ७८८

नाशाया बाह्य अंधार जगी विख्यात भास्कर
अंतर्बाह्य करी नष्ट श्रीगुरू तम केवळ ७८९

गुरूच्या दृष्टिक्षेपाने संकल्पाविण लाभते
शिवज्ञान असे तेचि वेद शांभव बोलिती ७९०

सुनिर्मल शिवज्ञान देताचि शिष्य पावतो
जीवन्मुक्तीस तो जाण श्रीगुरू ज्ञानसागर ७९१

## ४८. क्रियालिंगस्थल

गुरुज्ञानोपदेशाने लीन होई क्रिया जिथे
क्रियालिंग असे तेचि शिवागमज्ञ सांगती ७९२

परानंद चिदाकार परब्रह्मचि केवल
क्रिया सिद्ध करायास जाहले लिंगरूप ते ७९३

लिंग ज्योतिस्वरूपी ते परब्रह्मचि केवल
पूजिता लाभती सर्व सत्कर्मांची फले खरी ७९४

त्यागूनि सर्वही कर्मे लिंगपूजेत तत्पर
वर्तती एकनिष्ठेने योगी म्हणूनि श्रेष्ठ ते ७९५

एकांशे लिंगपूजेच्या क्रिया यज्ञादि मानुनी
पूजिती जे मुनी तेचि क्रियालिंग प्रशंसिती ७९६

रुची लिंगार्चनी ज्याला सर्व कर्मांत सिद्ध तो
यज्ञतपादि कर्मांचे नसे त्याला प्रयोजन ७९७

ब्रह्माविष्णुसुरादी ते लिंगाश्रयेचि जाहले
जगतंत्राधिकारी ते आपापल्या पदी स्थिर ७९८

## ४९. भावलिंगस्थल

होती लीन क्रिया जेथे क्रियालिंग जसे असे
तसा भाव जिथे लीन बोलिती भावलिंग ते ७९९

शुद्ध भाव जिथे तेथे होतो गोचर शंकर
नित्यतृप्त महादेवा क्रियेचे काय कारण ८००

आनंदरूप शंभूला भावफुले समर्पिता
होई भक्तावरी पूर्ण प्रसन्न परमेश्वर ८०१

मृत्तिका आणि पाषाण लिंगांहूनहि श्रेष्ठचि
देतसे ज्ञानमार्गात प्रवेश भावलिंग ते ८०२

त्यागूनि बाह्यलिंगाशी स्मरी चिल्लिंग मानसी
पूजितो भावपुष्पांनी भावलिंगीच जाण तो ८०३

आधारी हृदयी किंवा भ्रूमध्यात सुनिर्मल
ज्योतिर्मय पुजे लिंग भावद्रव्ये मुनीश्वर ८०४

स्वानुभवे चिदाकार ज्योतिर्लिंगात युक्त जो
शिलादी जड लिंगांचे कधी करी न पूजन ८०५

क्रियारूप असे जाण पूजा अज्ञ जनांस्तव
अंतरी भावलिंगास पूजिती सुज्ञ निश्चये ८०६

## ५०. ज्ञानलिंगस्थल

प्रकाशे भावलिंगासी ज्ञान पावे जिथे लय
स्थलास शिवतत्त्वज्ञ ज्ञानलिंग प्रशंसिती ८०७

त्रिगुणातीत ऐश्वर्ययुक्त ब्रह्मादि पासुनी
मुक्त जे ब्रह्म ते ज्ञानलिंग नामक बोलिती ८०८

क्रियेने स्थूल पूजावे भावाने सूक्ष्म लिंग ते
पूजिती ज्ञानलिंगास ज्ञानद्रव्येचि सर्वथा ८०९

स्थूल सूक्ष्म अशी रूपे मायाकल्पित जाण ती
मुमुक्षूंस्तव ते ज्ञानलिंगचि श्रेष्ठ बोलिती ८१०

परात्पर परब्रह्म परमानंदलक्षण
ब्रह्मास जाणतो तोचि ज्ञानलिंगी असे खरा ८११

बाह्य आंतर पूजांत होऊनि पूर्ण विन्मुख
अखंड ज्ञानरूपात राहे तो मुक्त निश्चित ८१२

## ५१. स्वयस्थल

ज्ञानलिंगिस्थली मग्न ज्ञानपूजेत सर्वदा
त्याला संबोधिती ज्ञानी स्वयस्थली असे पुढे ८१३

आचरे सर्व स्वच्छंदे सदा संतुष्ट मानसी
लिंगनिष्ठ जगा पाहे आत्मरूपात पूर्णत: ८१४

ममत्व-मीपणातूनि मुक्त क्लेशादि पासुनी
भिक्षान्नावरी संतुष्ट समत्व बाणले मनी ८१५

मिळे त्यात समाधानी भस्मनिष्ठ जितेंद्रिय
योगी-भिक्षुक-राजांशी समभावेचि पाहतो ८१६

संसारी रमती प्राणी वाटे विस्मय पाहता
स्वत: लीन परानंदी होऊनि वर्ततो सदा ८१७

शिवध्यान शिवज्ञान भिक्षा एकान्तवास हे
अपेक्षी चार यावीण मागेना पाचवे कधी ८१८

## ५२. चरस्थल

आत्मज्ञानी अहंकार-ममत्व लोपले असा
भ्रमे स्वयस्थली स्वत: बोलिती चर त्यामुळे ८१९

कामक्रोधांतुनी मुक्त शमादी गुणयुक्त तो
शिवरूपास सर्वत्र पाहात संचरे जगी ८२०

श्रेष्ठ कनिष्ठ पाहेना चिंताच पूर्ण वर्जिली
ब्रह्मभावे भ्रमे योगी सर्व भूमितलावरी ८२१

तोषेना लाभता मान कुंथेना अपमानिता
मानापमान त्यागूनि स्थिर आत्म्यात सर्वदा ८२२

अलौकिक गुणांनी तो करी लोकांस विस्मित
आत्मानंदात डुंबे तो सामान्यासम वर्ततो ८२३

लिंपेना पुण्यपापाने सामान्यासम नाचरे
देहधारी असूनि तो करीना कर्म कोणते ८२४

योगी प्राकृत संपत्तीतूनि विन्मुख पूर्णत:
शिवानंदात तल्लीन सर्वकाळ मुनीश्वर ८२५

## ५३. परस्थल

स्वये स्वरूप होऊनि करी संचार आपण
कोणी पर नसे जाणे तेणे परस्थली असे ८२६

सर्वस्वतंत्र कर्मांत स्वत:ला शिव मानितो
तृणासमान विश्वाला मानूनि वर्ततो स्वये ८२७

नसे वर्णाश्रमी निष्ठा त्याहूनि वेगळा असे
पाहूनि श्रेष्ठ आत्म्यास योगी आनंदतो मनी ८२८

विश्वातीत परब्रह्म चिद्रूप शिवनामक
मीच ते जाणतो तेणे सर्वोत्तमचि जाण तो ८२९

स्थिर शाश्वत आत्म्याचे करी अखंड चिंतन
नाशूनि विश्वभ्रांती ती जीवन्मुक्तचि जाहला ८३०

केली नाही जरी कर्मे करिती देव काय ते
कर्मातीत जहाला तो प्रत्यक्ष ब्रह्मरूपचि ८३१

त्यागूनि देहभावास स्वेच्छेने भूवरी भ्रमे
दर्शने प्रेमस्पर्शाने मुक्त करी जनांस तो ८३२

सच्चिदानंद शंभूशी जाहला एकरूप तो
वर्णाश्रमादि तोडूनि शृंखला वर्ततो जगी ८३३

स्वच्छंदे नररूपात करी संचार भूवरी
जीवन्मुक्तचि तो होई विजयी निजवैभवे ८३४

**लिंगस्थलांतर्गत भक्तस्थल संपूर्ण**



## ५४. क्रियागमस्थल

योगी प्रत्यक्ष शंभू तो पूजा त्याची असे क्रिया
वर्णिली आगमांमध्ये म्हणूनि ती क्रियागम ८३५

अग्नी प्रदीप्त होईना अरणीमंथनाविण
तसा क्रियेविना लिंगी दिसेना शिव निश्चित ८३६

देव प्रसन्नतो जेणे लोपावा न विधी कधी
आगमोचित पूजा ती करावी विधिपूर्वक ८३७

शास्त्रोक्त कर्म ही पूजा शिवाज्ञा जाण ती असे
शिवाराधन-बुद्धीने व्हावे आसक्त तीमधे ८३८

गुरु-आदेश मानूनि करावे शिवपूजन
पूजिता शंकरा एका पूजिल्या सर्व देवता ८३९

पूजेसाठी फुले बिल्व संपादिण्यात व्यग्र तो
शिवयोगसमाधीत मग्न तो मुक्त निश्चित ८४०

कर्म ज्ञानाविना अंध ज्ञान पंगू क्रियेविण
ज्ञानयुक्त क्रियेनेच मुक्ती जीवास लाभते ८४१

झाला ज्ञानी तरी कर्म त्यागू नये कधीच ते
फलाशेविण पूजावे योग्याने लिंग नित्यही ८४२

आचारचि अलंकार असे जगात मानिती
आचारहीन निंदेचा धनी लोकांत होतसे ८४३

आचारयुक्त ज्ञानाने प्रसन्नतो महेश्वर
मृत्युपर्यंत राहावे आचारशील होउनी ८४४

## ५५. भावागमस्थल

योग्याची भावचिन्हे ती सामान्यास्तव आगम
असे तेणे ठरे तोचि भावागमस्थली जणू ८४५

शिवोऽहं भावना हीच शिवप्राप्तीस कारण
ज्ञाने केवळ आचारे होईना शिवलाभ तो ८४६

यथार्थ रूप शंभूचे कळे ज्ञानामुळे खरे
पण ध्यानामुळे लाभे जीवा शिवत्व पूर्णचि ८४७

म्हणूनि शिवज्ञानाने योगी संपन्न तो जरी
शिवोऽहंभावनेनेच शिवस्वरूप होतसे ८४८

अंतर्बाह्य शिवे सर्व चराचरचि व्यापिले
अशा भावे सदा ध्यान करावे शिवत्वास्तव ८४९

अर्थहीन जशी वाणी पतीविण सती जशी
श्रुतिहीन जशी बुद्धी तशी भावेविना क्रिया ८५०

चक्षुहीन जसा रूप नसे समर्थ पाहण्या
भावहीन तसा योगी पाहू शके न शंकरा ८५१

भावपूर्ण मने पूजा करिता तुष्टतो शिव
केली भावेविना पूजा स्वीकारीनाच शंकर ८५२

भृंगध्यासे जशी आळी स्वये भृंगचि होतसे
शिवभावे तसे लाभे शिवरूपचि मानवा ८५३

निराकार शिवध्यानी असमर्थ कुणी असे
त्याने सगुण साकार ध्यावे मनात रूप ते ८५४

## ५६. ज्ञानागमस्थल

जीवात्मे शिवयोग्याची पाहूनि ज्ञानलक्षणे
मुक्त होती म्हणूनी तो ज्ञानागमस्थली असे ८५५

भावे कर्मे मिळेनाच फल जीवांस कोणते
भाव-कर्मांसवे ज्ञान देतसे मुक्ति निश्चये ८५६

जरी कोट्यवधी जन्मी कर्मे आचरिली तरी
मिळेना मुक्ति लाभे ती ज्ञानामुळेचि केवळ ८५७

ज्ञानशून्य क्रिया नित्य ठरे संसारकारण
ज्ञानयुक्त क्रिया मात्र संसारातूनि तारिते ८५८

यज्ञयागादि कर्मांनी मिळे तो स्वर्ग नश्वर
फल अक्षय लाभाया ज्ञानाभ्यासचि लागतो ८५९

करावा शिवशास्त्रांचा अभ्यास यत्नपूर्वक
शास्त्रांचे अन्य काहीच नसे येथे प्रयोजन ८६०

शिवाविण नसे काही बाणता ज्ञान हे दृढ
संसारदु:ख जाणावे त्याचे ते संपले असे ८६१

शिवरूपचि हे विश्व नसे काहीच त्याविण
मीही शिव अशी बुद्धी ज्ञान उत्तम मानिती ८६२

अंधास न दिसे वस्तू समोर ठेविली तरी
ज्ञानहीनास तैसाचि दिसेना शिव अंतरी ८६३

शिवदर्शन होताचि नाशतो जन्मरोग तो
ज्ञानाचे लाभता डोळे शिवाचे होय दर्शन ८६४

दीपावाचूनि नाशेना जसे घरातले तम
जाईना मोह तैसाच ज्ञानाविण मनातला ८६५

## ५७. सकायस्थल

देहाहंकार त्यागूनि कर्तृत्वभावही तसा
आत्मतत्त्वचि देहात दाखवी तो जनांप्रती ८६६

आत्मस्वरूप देहास मानिती लोक ज्याचिया
राहे कायेमधे तेणे सकाय त्यास बोलिती ८६७

संभवेना क्रिया भाव कायेवाचूनि ज्ञानही
म्हणूनि देहधारी तो होऊनि वर्ततो जगी ८६८

शिवैक्यज्ञान योग्यांना महात्म्यांनाहि लाभले
साधिले भोगमोक्षादी कायेमुळेचि निश्चित ८६९

काष्ठाविण प्रकाशेना अग्नी जसा कुठे कधी
देहाविण तसे नाही आत्मतत्त्व प्रकाशत ८७०

देवमूर्तीमुळे जागे पूज्यबुद्धी मनात ती
पाहता देह योग्याचा आत्मरूप ठसे मनी ८७१

निराकार महादेव परिपूर्ण सदाशिव
जगत्सृष्ट्यादि कार्यास घेतसे दिव्य देह तो ८७२

ब्रह्मादी देवता सर्व मोक्षकांक्षी मुनी तसे
देह घेऊनि साधिती तपादी कार्य आपुले ८७३

तपश्चर्याच सिद्धीच्या प्राप्तीचे मूळ कारण
देह साधन त्यासाठी तेणे त्यागू नये कधी ८७४

## ५८. अकायस्थल

औपचारिक जाणावे योग्याचे देहधारण
वर्जी संबंध मायेचा तेणे अकाय जाण तो ८७५

देही वसे तरी देहविकार सर्व त्यागिले
झाला शिवाप्रमाणे तो तेणे अकाय बोलिती ८७६

चिद्रूप परब्रह्मात झाला विलीन पूर्ण तो
नसे संबंध देहाचा दिसे देही भ्रमामुळे ८७७

देहाभिमान जाऊनि शिवभावात स्थिर तो
विश्व हा देह ज्याचा तो एका देही कसा वसे ८७८

नसे शिवैकनिष्ठाला अहंताजन्य तो भ्रम
देहाहंता नसे तेणे नसे इंद्रिय-दुःखही ८७९

नसे मानव वा देव नसे तो यक्ष राक्षस
शिवोऽहंभाव बुद्धीत देहकर्मी न लिंपतो ८८०

## ५९. परकायस्थल

मायामार्गास लंघूनि प्रकृतीलाहि जिंकिले
ब्रह्मरूप तनू झाली त्यामुळे परकाय तो ८८१

चिदानंदे प्रकाशूनि जाहला देह ब्रह्मचि
मग प्राकृत देहाची बाधा होईल ती कशी ८८२

दग्धले सूक्ष्मदेहाचे ज्ञान-अग्नीत बीज ते
शिवतत्त्वस्वरूपी तो बोलिती परकायचि ८८३

कर्मजन्य मनोवृत्ती इंद्रिय-व्यवहार ते
होती विलीन देहात तेणे तो परकायचि ८८४

ब्रह्म मी विश्व संपूर्ण चिदानंदचि रूप हे
जाणे तो देहधारी हे मानणे भ्रांतिमूलक ८८५

आहे चिद्रूप ज्योती मी असे जो चिंतितो मुनी
देहधारी जरी भासे विदेहीच तरी असे ८८६

राहो किंवा पडो देह आत्मबोधात लीन जो
तत्काळ प्राप्त त्याला ती जीवन्मुक्तीच निश्चित ८८७

सरे ती आत्मज्ञानाने जन्ममृत्यु-व्यथा पुरी
सूर्यापुढे टिके कैसा सांग अंधार भूवरी ८८८

देहाभिमान त्यागूनि परब्रह्मपदी स्थिर
होईलचि कसा योगी देहात बंदिवान तो ८८९

## ६०. धर्माचारस्थल

ब्रह्मरूप शरीरी त्या योग्याचे मुक्त वर्तन
दाखवी मार्ग लोकांस धर्माचार ठरे जगी ८९०

अहिंसा सत्य अस्तेय ब्रह्मचर्य दया क्षमा
दान पूजा जपोध्यान जाणावा धर्मसंग्रह ८९१

शिवागमांत शंभूने कथिला धर्मसंग्रह
धर्म आचरिता पात्र होई शिवकृपेस तो ८९२

स्पर्शू नये अधर्मास करावे धर्मवर्तन
निष्काम भाव ठेवूनि आणि ते ज्ञानपूर्वक ८९३

पाहावे आत्मरूपात प्राणिमात्रांस सर्वही
करू नये कृपा रोष जाणावे ज्ञान हे खरे ८९४

ममत्व भ्रांति लोपूनि विश्वी जो शिव पाहतो
मग त्यास नसे प्राप्त असे जगात काय ते ८९५

धर्माने लाभती सिद्धी धर्माचरण योग्यचि
नि:स्पृह तरी योग्याने धर्म सोडू नये कधी ८९६

जरी ज्ञानामृते तृप्त त्यागू नयेचि धर्म तो
योगिवर्तन पाहूनि तैसेचि वागती जन ८९७

आचार प्रिय शंभूला आचारे अर्चना घडे
सदाचाराविना कोणा शिवप्रसाद ना मिळे ८९८

## ६१. भावाचारस्थल

योग्याची भावना तीच भावाचार प्रशंसिती
व्यापिला शिव ज्याच्यात मनोव्यापार भाव तो ८९९

भावयुक्त घडे कर्म जाणावे अति पावन
भावनायुक्त होऊनि व्हावे धर्मी सदा रत ९००

भावामुळे मन:शुद्धी भावशुद्धी क्रियेमुळे
होते म्हणूनि योग्याने त्यागू नयेचि भावना ९०१

शिवभावे करी कर्मे नित्यनैमित्तिकादि ती
गुणदोषे न लिंपे तो शिवयोगी कदापिही ९०२

अंतरी ज्ञानसूर्याचे होतसे भावचिंतन
संध्यावंदन ते जाण सांगती आगमज्ञ ते ९०३

आत्मरूप चिदग्नीत विषयांस समर्पिता
अंतर्मुख अशा भावे मानिती होमकर्म ते ९०४

शिव संतुष्ट होतो या भावे कर्म घडे तरी
संसारसंगतीतूनि योगी निवृत्त होतसे ९०५

शिवार्पित करी कर्मे योग्य किंवा अयोग्य ती
होतसे तो महाभाग नि:संग पूर्ण निश्चित ९०६

विश्व आत्मा नि शंभूला एकरूपात पाहतो
सच्चिदानंदरूपी तो ओळखे शिव निश्चित ९०७

## ६२. ज्ञानाचारस्थल

ज्ञानाने युक्त आचार योग्यांचा मार्ग दावितो
सर्व जीवांस तेणे तो ज्ञानाचारस्थली असे ९०८

शिवाद्वैत खरे ज्ञान सांगती हेचि पंडित
सिद्धासिद्ध दुजे ज्ञान देईना फल कोणते ९०९

शिवाचे ज्ञान निर्दोष ठरे मोक्षप्रदायक
भेदयुक्त दुजे ज्ञान जन्ममृत्यूस कारण ९१०

शिवतत्त्व प्रकाशे जे महाज्ञानचि जाण ते
त्याच्यानुसार आचार ज्ञानाचारचि जाण तो ९११

वसे अभेदरूपाने शिवब्रह्मात विश्व हे
ज्ञाने या वर्ततो योगी ज्ञानाचारी असे खरा ९१२

गुरुदृष्टिप्रसादाने ज्ञान जे मुक्तिदायक
लाभता कर्मकांडासी अपेक्षील कसा कुणी ९१३

संसारमूळ ते कर्म जलासमान वाहते
दग्धता ज्ञान-अग्नीत पुन्हा न कर्म अंकुरे ९१४

शिवज्ञानाविना जीव बांधिला कर्मबंधनी
निष्काम आचरे त्याला कर्मे न बांधती कधी ९१५

विवेकी ज्ञानसंपन्न पाहे सर्व शिवामधे
जीवन्मुक्तचि तो वर्ते सामान्यासम भूवरी ९१६

**लिंगस्थलांतर्गत माहेश्वरस्थल संपूर्ण**



# लिंगस्थलांतर्गत प्रसादिस्थल

## ६३. कायानुग्रहस्थल

अनुग्रह करी लोकांवरी देऊनि दर्शन
कायानुग्रह नावाने योग्यास लोक जाणती ९१७

जसा ईश्वर मूर्तीत राहूनि करितो कृपा
तसा देहात राहूनि योगी सर्वानुग्राहक ९१८

मूर्तीत शिव राहूनि असे नि:संग पूर्णत:
तसा योगी शरीरात राहे नि:संग होउनी ९१९

शिवभावे सदा युक्त भेदांपासूनि वेगळा
मायारहित झाला तो प्रत्यक्ष शिवरूपचि ९२०

शिवानंदसमुद्रात मनोवृत्ती विलीन त्या
मायाकल्पित विश्वाला कधी पाहे न संयमी ९२१

नव्हे चांदी असे भान येताचि शिंपली दिसे
तसे भानावरी येता शिवरूप दिसे जग ९२२

जागे होताक्षणी वस्तू स्वप्नातली विरे जशी
तसे होता शिवज्ञान दिसेना विश्वजाल हे ९२३

असे अज्ञान संसारभ्रमाचे मूळ कारण
नष्ट होताचि ते कैसे होई संसारदर्शन ९२४

क्रीडेसाठी जणू देह योग्याने घेतला जगी
जीवन्मुक्त भ्रमे लोकांवरी कृपा करावया ९२५

## ६४. इंद्रियानुग्रहस्थल

पाहता शिवयोग्यास रोधावी इंद्रिये असा
जागे विवेक लोकांत कृपा ही इंद्रियांवरी ९२६

वर्तती इंद्रिये जेव्हा आपल्या विषयांमधे
जन्मती रागद्वेषादी तेणे ते वर्जिती मुनी ९२७

वर्तता बाह्य वृत्तीने इंद्रिये भवकारण
होता शिवासवे एकरूप ती मोक्षकारण ९२८

पाहे क्षणामधे शिव हृदी एकाग्र होउनी
क्षणी बाह्येंद्रिये पाहे दृश्य संसार सर्वही ९२९

असूनि इंद्रिये सर्व इंद्रियातीत जाण तो
शिवासक्त मनी योगी शिवाविण न पाहतो ९३०

नसे वार्धक्य मृत्यू तो क्षुधा तृषा नसेचि ती
अर्पिली इंद्रिये सर्व महात्म्याने शिवाप्रती ९३१

मन राहे जिथे तेथे राहती सर्व इंद्रिये
शिवात मन तल्लीन इंद्रिये उरती कुठे ९३२

दिसे दृष्टीपुढे जे जे करी मनात चिंतन
ते ते सर्व शिवानेच झाले असे प्रकाशित ९३३

इंद्रियांसह प्राणास स्थापितो संयमी मनी
शिव प्रत्यक्ष तो त्याचा संसारभ्रम नष्टला ९३४

सर्वेंद्रिये पुजे शंभू सर्वत्र बहिरंतर
स्वच्छंदे वर्ततो भूमीवरी तो संयमी सुखे ९३५

## ६५. प्राणानुग्रहस्थल

रोधूनि प्राण योगी तो पाहे शिवास अंतरी
सांगे लोकांस तो मार्ग प्राणानुग्रह जाण हा ९३६

शिवात जाहला लीन योग्याचा प्राण पूर्णत:
मग इंद्रियव्यापार खुंटले विश्वदर्शन ९३७

इंद्रिये विषयांतूनि त्याची निवृत्त जाहली
प्राणात इंद्रिये लीन होतसे शांत तो स्वये ९३८

प्राणवृत्ती शमे तेव्हा मनोवृत्ती शमे तशी
योगी तो शांत पाहेना अन्य काही शिवाविण ९३९

असे मनुष्यदेहास मुख्य आधार प्राणचि
शिव आधार प्राणाचा सर्वकारण तो असे ९४०

स्वये शिव निराधार शिवाधारचि प्राण तो
चालतो बोलतो देह प्राणाधारे जगामधे ९४१

योगबळे जरी प्राण लीन शिवात जाहला
शक्तिसंस्कारयोगाने योगी देहात राहतो ९४२

योगाभ्यासे करी प्राण लीन पूर्ण शिवामधे
तेणे अचल होऊनि योगी जगात वर्ततो ९४३

जाहल्या वासना नष्ट देहवेव्हार थांबला
शिवाशी ऐक्य पावूनि बुंध्यासमान स्थिर तो ९४४

## ६६. कायार्पितस्थल

शिवपूजाप्रसंगी तो देहाभिमान त्यागुनी
अर्पितो देह शंभूला तेणे कायार्पितस्थल ९४५

योगी शिवास ज्यावेळी अर्पितो देह आपुला
स्वये शिवचि तो होतो नसेचि यात संशय ९४६

विषयांतूनि उत्पन्न इंद्रिया प्रिय जी सुखे
सुखरूप शिवालाच करावी नित्य अर्पण ९४७

पाहता स्पर्शिता खाता ऐकता हुंगता मिळे
विषयांतूनि जे सौख्य शिवाला सर्व अर्पिणे ९४८

देहेंद्रियांमुळे जी जी सुखे योग्यास लाभती
शिवार्पित करी सर्व राहे निर्लिप्त होउनी ९४९

## ६७. करणार्पितस्थल

ज्ञान-कर्मेंद्रिये आणि इंद्रिये अंतरातली
शिवाशी जोडिता त्याला करणार्पित बोलिती ९५०

विषयांतूनि जे जन्मे सुख ते उपभोगितो
शिवाला अर्पितो तेणे ठरे तो करणार्पक ९५१

अहंकारमदे मत्त मन:कुंजर जाहला
शिवस्तंभास जो त्याला बांधील धैर्यवान तो ९५२

इंद्रियांचा मनोयोगे चाले व्यापार सर्वदा
मन स्वाधीन होताच येती हातात इंद्रिये ९५३

स्वाधीन इंद्रिये होता निवृत्ती त्यास बोलिती
शिवात लीन ती होता बुडे भवात तो कसा ९५४

संसारविषकांतार छेदणारी कुठारिका
मन:शांती मिळे सर्व हाती येताचि इंद्रिये ९५५

इंद्रियांच्या मुळे पाप पुण्य उत्पन्न होतसे
इंद्रिये अर्पिता ईशा कर्मबंधन कोठले ९५६

शिवरूप चिदग्नीत होमिता विषयांस त्या
भवपीडित जीवात्मा होतसे मुक्त निश्चित ९५७

चित्तद्रव्यासवे विश्व चिदग्नीतचि होमितो
शिवयोग्यास होईल कसा संसार बाधक ९५८

चिद्रूप आत्मज्योतीत प्राणाने जी प्रकाशते
होमी विषय जो योगी शिवरूपचि होतसे ९५९

भोगसाधन काया ही इंद्रिये सर्व साधने
मानितो शिवपूजेची मुक्ती त्यालाच लाभते ९६०

## ६८. भावार्पितस्थल

राहूनि मानसी दृढ शिवाला भाव अर्पिणे
मानिती शिवतत्त्वज्ञ यास भावार्पितस्थल ९६१

चाले मनन वस्तूचे चित्ती तो भाव मानिती
अर्पिणे भाव शंभूला भावार्पणचि जाण ते ९६२

भावनाच असे बंध आणि मोक्षास कारण
शुद्ध भावे मिळे मुक्ती अशुद्ध गुंतवी भवी ९६३

शिवोऽहं चिंतने भाव सांगती शुद्ध होतसे
त्याहूनि असता भिन्न कसे संपेल दुःख ते ९६४

भोक्ता भोजयिता भोज्य आणि सर्व चराचर
पाहता शिवरूपात लाभे शिवत्व निश्चित ९६५

मानूनि विश्व मिथ्या हे विश्वातीत शिवा स्मरे
संसारपाश योग्याला बांधूनि ठेविती कसे ९६६

कर्मे शिवार्चना सर्व बोलणे हेचि कीर्तन
असा भाव असे त्याला कोठले कर्मबंधन ९६७

कर्मानुसार दुःखादी लाभे जे इंद्रियांस ते
शिवार्पित करी सर्व जीवन्मुक्तचि होय तो ९६८

## ६९. शिष्यस्थल

घेई ज्ञानधडे भावे शिवयोग्याकडूनि जो
अपेक्षी मोक्ष तो शिष्य असे ज्ञात जगामधे ९६९

कायावाचामनाने तो नित्य गुरूस अर्चितो
ध्यान स्तोत्र करी पूजा बोलिती शिष्य त्यासचि ९७०

इंद्रियनिग्रही शांत तपस्वी सत्य बोलतो
समबुद्धी अभेदत्वे पाहे गुरु-शिवांस तो ९७१

गुरू हाच असे शिव शिव हाच असे गुरू
सुज्ञ शिष्यवरे भेद दोघांमध्ये करू नये ९७२

शिवाचार शिवध्यान शिवज्ञान त्रयांविषी
ठेवावी दृढ निष्ठा ती गुरु-आज्ञेनुसारचि ९७३

ब्रह्मांडे बुद्‍बुदे ज्यात मायासागर दुस्तर
गुरुकटाक्ष-अग्नीत क्षणकाळात नाशितो ९७४

रसायनामुळे जैसे लोहाचे स्वर्ण होतसे
तसा गुरुकटाक्षाने होतसे शिव जीवही ९७५

गुर्वाज्ञा नच लंघावी उजळी शिवज्ञान ती
आज्ञाधारक शिष्यास सर्वसिद्धीच लाभती ९७६

शिवरूपचि संपूर्ण विश्व हे जाणतो असे
गुरुबोधे स्वरूपास जाणे तो शिष्य मुक्तचि ९७७

नाशे संसार ते ज्ञान गुरूकडूनि घेतसे
तेणे शांत सुखी राहे जीवन्मुक्तचि शिष्य तो ९७८

## ७०. शुश्रूषुस्थल

शिवयोग्याकडूनि जो सर्वदा जाय बोधिला
आसक्त श्रवणी शिष्य शुश्रूषु त्यास बोलिती ९७९

सत्य काय असत्य ते आत्मा कोण असे शिव
विचारी तो असे श्रेष्ठ शिष्य सेवारताहुनी ९८०

गुरुवाक्ये पुनःपुन्हा ऐकूनि शिव जाणतो
शांत होती मनोवृत्ती मुक्तिपदास पावतो ९८१

गुरुवाक्यांविना चित्त होईनाच प्रफुल्लित
सूर्याविण विकासेना जैसी कमलिनी कधी ९८२

जसा सूर्योदयी तेजे सूर्यकांत प्रकाशतो
तसा गुरुकटाक्षाने शिष्य ज्ञाने प्रकाशतो ९८३

कर जोडूनि शिष्याने ब्रह्मनिष्ठ गुरूकडे
परमानंदबोधाचा विचारावा उपाय तो ९८४

विश्व सामावले ज्यात सांगा ते तत्त्व कोणते
क्रियेने कोणत्या मोक्ष लाभे लोकांस या जगी ९८५

शिष्याचे प्रश्न एकाग्र होऊनि ऐकती गुरू
बोधिती तत्त्व ते ज्याने संसार पावतो लय ९८६

शिवतत्त्व असे श्रेष्ठ सच्चिदानंदरूप जे
त्याहूनि भिन्न तत्त्वांस नसे अस्तित्व किंचित ९८७

चांदीस शिंपला जैसा असे आधार सर्वथा
तसा प्रपंच संपूर्ण स्थिरावला शिवावरी ९८८

शिव मी दृढ या भावे शिवाचे होय दर्शन
मग संसारभ्रांतीची सुटेचि गाठ निश्चित ९८९

मी शिवचि नसे अन्य करी असेचि चिंतन
अद्वैत स्थिरता चित्ती जीवन्मुक्तीच लाभते ९९०

गुरूने बोधिला शिष्य गुणांनी परिपूर्ण जो
जगी शिवास पाहूनि जीवन्मुक्तचि होय तो ९९१

## ७१. सेव्यस्थल

लाधले फल बोधाचे गुरुवाक्यामृते जया
सेवा घेण्यास तो योग्य म्हणूनि सेव्य तो असे ९९२

गुरूपदिष्ट विज्ञान स्थिरले दृढ मानसी
शिवबोधामुळे शिष्य पूज्य होतो गुरूसम ९९३

श्रेष्ठत्व लाभले ज्ञानसंपदेने गुरूस ज्या
लाभे शिष्यास तेणे तो ठरे पूज्य गुरूसम ९९४

शिवोऽहंभाव-अभ्यासे अंगी शिवत्व बाणले
शिवासमान शुश्रूषु ठरे वंद्य जगामधे ९९५

आसक्त विषयांमध्ये परि नि:संग तो असे
शिवभावे असे युक्त योगी पूज्य शिवासम ९९६

विराले सर्व संदेह शिवाद्वैतात स्थिर तो
कृपेने सर्व जीवांचे अज्ञान नाशितो स्वये ९९७

परशिवात आत्माच ज्याचा विलीन पूर्णत:
शिवयोगी असे सेव्य जनांकडूनि ह्या जगी ९९८

**लिंगस्थलांतर्गत प्रसादिस्थल संपूर्ण**



## लिंगस्थलांर्तगत प्राणलिंगिस्थल

### ७२. आत्मस्थल

गुरुबोधामुळे योगी जीवभावास त्यागुनी
वागतो ब्रह्मभावाने आत्मस्थली म्हणूनि तो ९९९

केशाग्राच्या शतांशे तो जीवात्मा अंतरी वसे
प्रारब्धकर्म भोगीत जळे दीपासमान तो १०००

सर्व भूतांमधे आत्मा जरी व्यापूनि राहिला
देहात बद्ध होऊनि राहे मलत्रयांमुळे १००१

दिसे स्फटिक जास्वंदी रंगाने रंगला जसा
अहंकारे तसा आत्मा देहाभिमान वाहतो १००२

सर्वत्र व्यापिला आत्मा निर्देही निष्कलंक तो
मायादेहात राहूनि संसारी भ्रमतो सदा १००३

देहेंद्रियांहुनी भिन्न आत्मरूपास जाणणे
होता हे ज्ञान त्यालाच होतसे आत्मलाभ तो १००४

नसे आत्म्यास निर्देही देहसंबंध मूलत:
अज्ञाने कर्म भोगाया देह घेऊनि वावरे १००५

आत्मा न देव गंधर्व नसे तो यक्ष राक्षस
नसे मनुष्य-प्राणीही नसे वस्तूहि स्थावर १००६

कर्मे आचरिती नाना नाना योनींत जन्मती
भोगिती भोग कर्मांचे वाहती बुद्धि वेगळी १००७

भिन्न चोखाळती मार्ग नाना संकल्प योजिती
अल्पज्ञ अल्पकर्तृत्वे फुशारती जगामधे १००८

जगन्नायक शंभूचे चाले विश्वात नाटक
बाहुल्या होउनी त्याच्या नाचती नाटकामधे १००९

कर्मानुसार स्वर्गात जाती वा नरकामधे
पुन्हा गर्भात येऊनि योनींमधूनि हिंडती १०१०

मरती जन्मती तैसे पुन्हा मरण पावती
भ्रमती घोर संसारी विश्रांतीविण सर्वदा १०११

आणवादी मले युक्त दुःखसर्वस्व कल्पित
निवृत्त होय जीवत्व शिवाद्वैतामुळे पुरे १०१२

## ७३. अन्तरात्मस्थल

गुरुबोधामुळे नष्ट जेव्हा जीवत्व होतसे
होतसे प्राप्त तो भाव अंतरात्मचि निश्चित १०१३

देहात राहूनि जीव संगापासूनि वेगळा
भरला ब्रह्मभावाने अंतरात्माचि बोलिती १०१४

जीवात्मा-परमात्म्याच्या मध्यस्थलामधे वसे
द्वय धर्मी असे तेणे अंतरात्मा असेचि तो १०१५

मनुष्यादी भ्रमासी त्या अहंकारचि कारण
नाही स्वभाव आत्म्याचा जाणतो अंतरात्म तो १०१६

पद्मपत्र जलामध्ये जसे भिजेच ना कधी
तसा देहातला आत्मा संगापासूनि वेगळा १०१७

पक्षी खोप्यातला जैसा भिन्न खोप्याहुनी दिसे
तसा देहाहुनी भिन्न अंतरात्मा प्रकाशतो १०१८

झाकिती मेघ चंद्रास परि मेघांत तो नसे
अंतरात्मा तसा देही राहूनि पूर्ण वेगळा १०१९

अहं ममत्व सोडूनि उपाधीतूनि मुक्त तो
देही राहूनि योगाने पाहे शिवास सर्वदा १०२०

त्यागूनि विषयांस त्या जीवभावातुनी सुटे
मुक्त शिवप्रसादाने आत्मरूपे प्रकाशतो १०२१

शिव प्रेरक सर्वांच्या नांदतो हृदयांमधे
शिवज्ञानामुळे योगी मुक्तात्म्यासम तोषतो १०२२

## ७४. परमात्मस्थल

नाशे अज्ञान ज्ञानाने जाण संसारकारण
एकरूप परात्म्याशी म्हणूनि परमात्म तो १०२३

स्वयंप्रकाश शंभूने स्वतेजे विश्व व्यापिले
सर्व आत्म्यांत तो श्रेष्ठ परमात्मा म्हणूनि तो १०२४

ज्याच्या मायासमुद्रात ब्रह्मांड बुद्बुदे अती
जन्मती निमती त्याला परमात्मा प्रशंसिती १०२५

अग्नीमधूनि स्फुल्लिंग जीव ज्योतिर्मयी तसे
होती जाती जिथे जाण परमात्मस्वरूप ते १०२६

समुद्रात जशा लाटा तशी तत्त्वे समस्तही
जन्मती निमती ज्यात परमात्मस्वरूप ते १०२७

त्रिमलांवेगळे आणि जीवनाधार पूर्ण जे
श्रेष्ठ तत्त्वांहुनी सर्व परमात्मस्वरूप ते १०२८

व्यापितो सूर्य तेजाने आपुल्या विश्व पूर्ण हे
तसा शक्तिवशे सर्व परमात्मा प्रकाशतो १०२९

भासे जगी परी विश्वमायेपलीकडेच तो
ज्योतिर्मय प्रकाशे तो जीवात्म्यांस्तव या जगी १०३०

## ७५. निर्देहागमस्थल

असे देह तरी नाही देहाभिमान किंचित
आत्मत्वे वर्ततो त्यास निर्देहागम बोलिती १०३१

अहं ममत्व संसारकारण सर्व नाशिले
पराहंतेत जो मग्न देहप्रीती कुठे तया १०३२

चिद्रूप सागरी मग्न गंभीर निष्प्रपंच त्या
जाहला तो करी कैसा देहचिंता निरर्थक १०३३

अपरिच्छिन्न चिद्रूप चिदाकाशास चिंतितो
देहधारी तरी देहविकारे लिप्त होइना १०३४

अखंड ज्ञानरूपी जो आनंदरूप एकला
जाणे आत्म्यास तो सांग कसा होईल मोहित १०३५

ब्रह्म एक उपाधीने भासते वेगवेगळे
असे जाणे कसा तोच देही होईल सीमित १०३६

भेदबुद्धीच सर्वांच्या असे भेदांस कारण
अद्वैत लाभता बुद्धी भेदाची न उरे कथा १०३७

शिवरूपचि मी ऐसी भावना दृढ व्यापक
बुद्धीत बाणली त्याला देहविकार कोठले १०३८

## ७६. निर्भावागमस्थल

आत्मरूपाविना अन्य सारिता दूर भावना
विकारशून्य जो शुद्ध भाव निर्भाव बोलिला १०३९

अहं ब्रह्मास्मि भावात वस्तू दोन समावल्या
होता ब्रह्म अहं एक निर्भावागम जाण तो १०४०

निष्कलंक चिदाकाशी झाला तादात्म्य पूर्णत:
जातिवर्णादि-देहाचा संबंध त्यास कोठला १०४१

दूर वाणी-मनाच्या जे चिदाकाश तिथे स्थिर
योगी जो जाहला त्याने करावी भावना कशी १०४२

शुद्धाशुद्ध स्थली सूर्य समत्वाने प्रकाशतो
शिवाद्वैती तसा सर्व समत्वे विश्व पाहतो १०४३

जुमानीना जरा-मृत्यू क्षुधा-तृषेस ना वश
स्वात्मानंदी सदा मग्न विचरे सर्वकाळ तो १०४४

## ७७. नष्टागमस्थल

नष्टली त्रिपुटी ज्याची ज्ञाता ज्ञेय नि ज्ञान ही
भेदज्ञान नसे तेणे नष्टागमस्थली असे १०४५

अद्वैत भरले ज्याच्या मानसी परिपूर्ण ते
त्याला अन्य पदार्थांचे ज्ञान असेल ते कसे १०४६

मी न कर्ता न ज्ञाता मी देह ना मी निरंजन
असा चिंतक त्याच्यात शिवज्ञान प्रकाशते १०४७

आत्मरूपात जो लीन योगी विरक्त सर्वदा
जाणावी वस्तु जी त्याने असे जगात कोणती १०४८

ज्ञाता ज्ञान नुरे ज्ञेय तेथे जाणेल कोण तो
आणि कोणास सांगेल हे तरी कोण सांग तू १०४९

व्यापूनि ब्रह्मचैतन्य सर्व विश्वात राहिले
त्याविण अन्य काहीच शिवयोगी न जाणतो १०५०

## ७८. आदिप्रसादिस्थल

विश्वचालक शंभूला आदि नामे प्रशंसिती
पदी त्या स्थिर त्यालाच आदिप्रसादि नाव हे १०५१

पुण्य संपादुनी जन्मी असंख्य शुद्ध जाहला
द्यावया मोक्ष त्यालाच होतो प्रसन्न ईश्वर १०५२

शिवप्रसाद-संपत्तीमुळे शिवत्व लाभले
शिवाविण जगज्जाल अन्य त्यास न भासते १०५३

संसारच्छेदकारी तो शिवप्रसाद लाभुनी
भेदूनि मोहग्रंथीस विवेकी मोक्ष मेळवी १०५४

प्रसादाविण शंभूच्या संसारनाश होइना
सूर्योदयाविना नष्ट कसा अंधार होइल १०५५

देतसे मोक्ष जीवांना कृपेने शिव आपुल्या
पाशमोचन होण्यास नसेचि अन्य कारण १०५६

## ७९. अन्त्यप्रसादिस्थल

पावती लय भूम्यादी तत्त्वे ज्याच्यात अन्त्य तो
त्याचा प्रसाद ज्याला तो अन्त्यप्रसादि बोलिला १०५७

देव-तिर्यक्-मनुष्यादी मायाकल्पित भेद हे
माया उल्लंघिता सर्व भेदव्यापार थांबतो १०५८

सच्चिदानंद ब्रह्माचे रूप स्वत:च जाहला
कसे अन्य पदार्थांचे ज्ञान-ज्ञातृत्व संभवे १०५९

गाढ निद्रेत वस्तूंचे उरेना भान बाह्य त्या
तसे त्या मुक्त जीवास दिसेना अन्य दृश्य ते १०६०

जसे अखंड आकाश स्वभावे निर्विकारचि
जीवन्मुक्त तसा योगी आत्मरूपे प्रकाशतो १०६१

जीवन्मुक्तास काहीच दिसेना दृश्य कोणते
नसे कर्तव्यही त्याला राहे होऊनि निश्चल १०६२

शिवज्ञाने निमाला तो वस्तुभेद मनातुनी
चिद्‌विलासचि जो पाहे त्याने व्हावेच कोण ते १०६३

## ८०. सेव्यप्रसादिस्थल

श्रीगुरू सेव्य सर्वांना शिव प्रत्यक्ष तो असे
गुरुप्रसाद सर्वांना परानंदप्रकाशक १०६४

गुरुबोधचि जाणावा गुरुप्रसाद निर्मल
गुरू आणिक बोधास मानावे एकरूपचि १०६५

गुरू आणि गुरुबोध यांत अभेद मानितो
शिवयोगीच जाणावा सेव्यप्रसादवान तो १०६६

गुरूचि शिव तैसाच जाणावा गुरू शिवचि
दोहोंत चिंतिता ऐक्य उरेना ज्ञेय किंचित १०६७

वाणी-मनांस अप्राप्य अखंड आत्मरूप ते
त्यात जो लीन वाटेल त्याला कशात ती रुची १०६८

तृप्त ज्ञानामृते कैसा मागेल अन्य वस्तु तो
आत्मानंदात तो न्हाला स्वस्वरूपे प्रकाशतो १०६९

जाहला मुक्तिलाभाने सच्चिदानंदरूप त्या
नित्यतृप्तास लागेल कशास भोगसाधन १०७०

बाह्य-आंतर कर्मांचे नसेचि त्यास कारण
त्यागूनि देहभ्रांतीस शिवरूपी निमग्न तो १०७१

कर्मबंध-तपस्यादी योगाभ्यासहि ध्यान ते
यांत रमे न योगी तो आत्मरूपात रंगला १०७२

**लिंगस्थलांतर्गत प्राणलिंगिस्थल संपूर्ण**



# लिंगस्थलांर्तगत शरणस्थल

## ८१. दीक्षापादोदकस्थल

दीक्षेने नाशिले द्वैत अद्वैत रुजले मनी
ऐक्यानंद गुरु-शिष्य समत्वे अनुभाविती १०७३

श्रीगुरू शिष्य दोघांचा आनंद एक होतसे
स्थितीस मानिती दीक्षापादोदक शिवज्ञ ते १०७४

पाद हा श्रीगुरू आणि शिष्या उदक मानिती
त्यांचे ऐक्यचि ते दीक्षापादोदक प्रशंसिती १०७५

पाद जाण परानंद ज्ञाना उदक मानिती
दोहोंचे ऐक्य ते दीक्षापादोदकचि बोलिती १०७६

परमानंदभावाने लाभले ज्ञानतेज ते
महायोगी न देखेचि जगात भेद कोणता १०७७

देशकालादि भेदांच्या पलीकडे सुनिर्मल
ब्रह्मानंद जया प्राप्त तो न काहीच इच्छितो १०७८

लाभे गुरुप्रसादाने शुद्ध ज्ञानामृतात त्या
रमे वर्जूनि संसाररोग योगी महान तो १०७९

## ८२. शिक्षापादोदकस्थल

दीक्षेने सिद्ध जे ज्ञान त्याचे मनन जाण ते
शिक्षागुरूच ते शिक्षापादोदक प्रशंसिती १०८०

शास्त्रसागर युक्तीच्या रवीने मंथिल्यावरी
शिवाद्वैतामृताचा तो लाभ शिष्यास होतसे १०८१

ज्ञानचंद्रातुनी ब्रह्मानंदाचे चांदणे झरे
हृदयी मुक्तिरात्रीत शिवयोगी पहातसे १०८२

देशकाले न खंडी तो परमानंद लाभता
पाहण्या-ऐकण्याजोगे जाणण्यासारखे नुरे १०८३

आत्मानंदात जो तृप्त रमेना विषयांत तो
तृप्त गंगाजले त्याला नसे कूपजली रुची १०८४

नसती रागद्वेषादि लाटा त्या सुखसागरी
निमग्न महायोग्याच्या सीमा सुखास ती कशी १०८५

गुरुप्रसादचंद्राने मनोपद्म विकासले
ज्याचे त्याला कशी सांग भ्रांती असेल कोणती १०८६

## ८३. ज्ञानपादोदकस्थल

आनंद-ज्ञान ऐक्याची लाभते पूर्ण संपदा
ऐक्य तेच असे ज्ञानपादोदकचि जाण तू १०८७

मुक्त अज्ञानराहूच्या पासूनि ज्ञानचंद्र तो
परानंद महातेजे हृदाकाशी प्रकाशतो १०८८

अविद्यामेघ सारूनि पूर्णज्ञानसुधाकर
निजानंदसमुद्रास आणतो भरती स्वये १०८९

ध्वस्त अंधार मोहाचा ज्ञानचंद्रोदयामुळे
होऊनि भोगिती योगी स्वरूपानंद पूर्णत: १०९०

संपली रात्र मायेची बोधसूर्य प्रकाशला
व्यापारशून्य होऊनि निद्रिस्त संयमी सुखे १०९१

अविद्या दूर होई त्या क्षणी योग्यास होतसे
प्रपंचाविण ब्रह्माचा आनंद हृदयामधे १०९२

ज्याचे निजस्वरूपात विलीन चित्त जाहले
त्याला संसारजाणीव राहू शकेल ती कशी १०९३

कुठे ब्रह्मा कुठे विष्णू कोठला रुद्र सूर्य तो
आत्मस्वरूप-तेजाशी तुळू न शकती कधी १०९४

अपरोक्ष परानंदी योगी जो मग्न जाहला
त्यास ब्रह्मादी देवांची सुखे ती तुच्छ वाटती १०९५

चिदानंदांश जे सौख्य वांछिती लोक सर्वही
मग श्रेष्ठ चिदानंद अपेक्षीना कुणी कसा १०९६

## ८४. क्रियानिष्पत्तिस्थल

जसा दोरीवरी भास सर्पाचा होतसे तमी
तशा योगिक्रिया तेणे क्रियानिष्पत्तिवान तो १०९७

ज्ञानाग्नीत जळे कर्म ठरेना जन्मकारण
जसे अग्नीत दग्धले अंकुरेनाच बीज ते १०९८

निरहंकार ज्ञान्यास स्पर्शेना कर्म कोणते
प्रतिबिंबातल्या डागे कसे मळेल बिंब ते १०९९

मेघामुळे नभी जैसा चालताना दिसे शशी
तसा देहामुळे योगी भासे कर्म करी असे ११००

कर्मारूढ दिसे ज्ञानी परि कर्मे न लिप्त तो
चाखे घृतादि जिव्हाही परि लिंपे न त्यामुळे ११०१

मूलाहंता गळालेल्या योग्याची जी क्रिया असे
पूर्ण निष्फल होऊनि पाहण्यापुरती उरे ११०२

चाले थांबे करी निद्रा क्रियारहित तो नसे
कर्म स्वभाव देहाचा परी फळे न ते कधी ११०३

महानंद मनी भोगी योगी तो शुद्धमानस
नाना भोगफळे देई ठरेना कर्म पीडक ११०४

## ८५. भावनिष्पत्तिस्थल

शिंपीठायी दिसे चांदी भाव योग्यामधे तसा
प्रतीत होय तेणेचि भावनिष्पत्तिमान तो ११०५

ज्ञानयोग्यास संबंध भावनेचा जरी नसे
शिवाठायी तरी भाव असावा नित्य जोडिला ११०६

ज्ञानरूप स्वये झाला त्यागू नयेचि भावना
शिवभावचि जाणावा भवसागरतारक ११०७

जन्मदु:ख निवारूनि लीन होई शिवामधे
जसे काष्ठास जाळूनि होतसे शांत पावक ११०८

साध्य झाल्यावरी सिद्ध ठरे निरर्थ साधन
लाभता शिव तैसेचि भावाचे न प्रयोजन ११०९

भाव ज्ञानासवे ऐक्य परशिवात पावतो
शिवोऽहंभावनायुक्त संयमी तो प्रकाशतो १११०

नव्हे भावाविना ज्ञान ज्ञानाविना न भावना
दोन्ही कारण मोक्षास आश्रयाव्या म्हणूनि त्या ११११

## ८६. ज्ञाननिष्पत्तिस्थल

प्रपंचज्ञान योग्याचे असे स्वप्नासमान ते
लीन आत्म्यात तेणेचि ज्ञाननिष्पत्तिवान तो १११२

पावे स्वप्नातले ज्ञान स्वप्नवस्तूंसवे लय
आत्मज्ञानामधे तैसे प्रपंचज्ञान लोपते १११३

परिपूर्ण महानंदस्वरूपी लीन जाहला
त्याने पदार्थ जाणावा असा विश्वात कोणता १११४

अखंड सच्चिदानंदस्वरूप ब्रह्म केवल
त्याहूनि भिन्न ते मिथ्या जाणणे ज्ञान हे असे ११११५

भिन्न सद्रूप ब्रह्माच्या नामरूप घटादि ते
त्याहूनि भिन्न ब्रह्मास जाणणे ज्ञान बोलिती १११६

कार्यकारणभावाच्या उपाधींच्या पलीकडे
ब्रह्म ते मीच ही निष्ठा ज्ञान यालाच बोलिती १११७

ब्रह्मात लीन संपूर्ण निमाले भेद सर्वही
ज्ञाता ज्ञान असा तेथे कसा व्यापार संभवे १११८

## ८७. पिंडाकाशस्थल

महाकाश वसे जैसे पिंडात परिपूर्ण ते
तसा देहात आत्माही पूर्णरूपे प्रकाशतो १११९

जरी देहस्थ तो आत्मा परिपूर्णचि तो असे
विवेकास अशा पिंडाकाशस्थल प्रशंसिती ११२०

घटोपाधीत आकाश पूर्णरूपेचि राहते
तसा पिंडातही आत्मा पूर्णरूपेचि राहतो ११२१

अंतरातील आकाशी शिव शाश्वत राहतो
असे जो भावितो जाण पिंडाकाशस्थलीच तो ११२२

पाहा छत्तीस तत्त्वांनी देह-देऊळ निर्मिले
बोधदीप प्रकाशात हृत्पद्मासन शोभले ११२३

पराकाशस्वरूपी तो प्रकाशे परमेश्वर
हृदाकाश गुहेमध्ये लीन ज्ञान्यांस भासतो ११२४

निर्मिले सप्त धातूंनी शिवपूर शरीर हे
अंत:पुर तिचे सूक्ष्म हृदाकाश मनोहर ११२५

राहतो शिव साक्षात सच्चिदानंदलक्षण
नित्य प्रकाशरूपाने जलातल्या नभासम ११२६

घटोपाधीमुळे जैसे घटी आकाश भासते
हृदाकाशात तैसाचि आत्मत्वे शिव राहतो ११२७

## ८८. बिंद्वाकाशस्थल

माथ्यावरील जीवांच्या जसे आकाश व्यापक
बिंदुरूप तसा आत्मा हृदाकाशात व्यापिला ११२८

आत्मस्वरूप योग्याचे आकाश-उपमेसह
केले विशद तेणे तो बिंद्वाकाशस्थली असे ११२९

सर्व प्राण्यांतला वायू असे एकचि व्यापक
तसा त्यांच्यातला आत्मा जाणावा एक व्यापक ११३०

जसा एकचि अग्नी तो भासतो सगळीकडे
सर्वात्मा शंभु तैसाचि व्यापिला भेद वर्जुनी ११३१

जीवांच्या हृदयांतील चित्तरूपी जलामधे
दर्पणासमान शंभू तो आत्मत्वे प्रतिबिंबला ११३२

प्रकाशरूप शंभू तो परेच्याही पलीकडे
राहतो सर्व जीवांत तरी तो सर्वव्यापक ११३३

एकचि सूर्य सर्वत्र स्वतेजाने प्रकाशतो
शक्तियोगे तसा शंभू आकाशासम व्यापक ११३४

## ८९. महाकाशस्थल

महाकाशाहुनी पिंडातले आकाश वेगळे
नसे तसाच आत्माही परात्म्याहुनी वेगळा ११३५

आत्मचैतन्य योग्याचे परमात्माचि पूर्णत:
जाणे हे तोच जाणावा महाकाशस्थली मुनी ११३६

घटा-मठातले जैसे नसे आकाश भिन्न ते
तसा पिंड नि ब्रह्मांडातला आत्मा न वेगळा ११३७

अगोचर प्रमाणांसी आणि वाणी-मनासही
सर्वतोमुख चिद्रूप सृष्टि-लयापलीकडे ११३८

कालातीत कलांनाही आकळेनाच जे कधी
अनुभूतीस संवेद्य ज्योतींचे उगमस्थल ११३९

शिव नामक ते ब्रह्म परमाकाशलक्षण
महालिंगचि अस्तित्व नसे जगास त्याविण ११४०

अव्यक्त ते पराकाश ज्ञानानंदस्वरूप ते
ज्योतिर्लिंग जिथे योगी पावती लय पूर्णत: ११४१

परमानंदरूपाने चैतन्य सर्वश्रेष्ठ ते
परमाकाश नावाने संबोधिती मुनी तया ११४२

सिंधुरूपाहुनी लाटा वेगळ्या नसती जशा
तसे शिवाहुनी विश्व नसेचि वेगळे कधी ११४३

वृक्षरूपाहुनी पाने फुले होती न वेगळी
शिवोत्पन्न तसे विश्व त्याच्याहूनि न वेगळे ११४४

महाकाशात नक्षत्रे तेवती वेगवेगळी
पराकाशात ब्रह्मांडे विशेषत्वे प्रकाशती ११४५

उपाधिशून्य तेजस्वी पराकाशचि निर्मल
विश्वचित्रास रेखाया असे आधारभिंत ते ११४६

## ९०. क्रियाप्रकाशस्थल

चिदाकाशस्वरूपी त्या शिवाचे परिपूर्ण जो
आत्मरूपे करी ध्यान क्रियाप्रकाशवान तो ११४७

निष्कलंक चिदानंदरूप आकाश तो जणू
त्याचे ध्यान मनोवृत्ती ज्ञानरूप शिवासम ११४८

निष्कलंक निराकार नित्य तेज:स्वरूपी त्या
विलीनचित्त योग्याची तेजोरूप क्रिया असे ११४९

सर्वज्ञ सर्वकर्ता जो सर्वव्यापी महेश्वर
योगी तो ऐक्यध्यानाने तत्स्वरूपे प्रकाशतो ११५०

इंद्रिये-व्यवहारात वर्तती संयमी जरी
तरी ऊर्ध्वमुखाने तो तुष्टे शिवास पाहुनी ११५१

सर्वसाक्षी गुणातीत ज्ञानवैराग्यमंडित
शिवतत्त्वास आत्म्यात योगी पाहूनि तोषतो ११५२

प्रकाशती क्रिया सर्व गंधर्वनगरीसम
क्रियाप्रकाश तेणेचि असे स्थलास नाव हे ११५३

## ९१. भावप्रकाशस्थल

लाटा अभिन्न सिंधूशी योगि-आत्म्यातही तसे
अभिन्न भावबुद्ध्यादी हेचि भावप्रकाशन ११५४

शिवरूपचि हे विश्व मीही शिवचि तो असे
भावितो त्यास संसार कधी ठरे न बाधक ११५५

शिवभावात जो स्थिर वेगळा विषयांतुनी
सर्वही भावना त्याच्या शिवरूपचि जाण तू ११५६

अद्वितीय शिवामध्ये पूर्ण जो ऐक्य पावला
अन्य शिवाहुनी काही तो न करीच भावना ११५७

गळाले पाश मोहाचे जाणे आत्माच केवळ
इंद्रिये वळती जेथे शिवरूप तिथे उभे ११५८

भावना रागद्वेषादी देती संसारक्लेश त्या
नाशूनि तेथेचि जाण जागतो शिवभाव तो ११५९

नसे तमात सामर्थ्य सूर्या ग्रासावया कधी
तसे अज्ञान आत्म्यास झाकाया असमर्थ ते ११६०

## ९२. ज्ञानप्रकाशस्थल

वाच्यार्थ थांबतो जेथे लक्ष्यार्थ सांगणे तिथे
लक्ष्यार्थिने प्रकाशे ते ज्ञानप्रकाशनस्थल ११६१

लक्ष्यार्थज्ञान योग्यास नसेचि ज्ञेयही तसे
उपाधियुक्त जे ज्ञान सर्व भेदांस पोषिते ११६२

लिंगांगी भेद हे द्वैतज्ञान पंडित मानिती
अखंड शिवज्ञानात कैसा तो भेद संभवे ११६३

नसे विषय ज्ञानाचा चिदानंदस्वरूप ते
चिंतिले ऐक्य त्याच्याशी ज्ञान विद्वान मानिती ११६४

अखंडानंदरूपी ते चिद्रूप विश्वरूपही
जाणे ते त्यास तत्त्वज्ञ ब्रह्मज्ञान प्रशंसिती ११६५

विश्वभेद नुरे ऐसे जाहले ब्रह्मज्ञान ते
शिवरूपचि ते सर्व दिसे दिसे न अन्य ते ११६६

अद्वैतज्ञान मोक्षाचे जाणे जो मूळ कारण
भावितो त्यास स्पर्शेना कधी संसारदु:ख ते ११६७

श्रेष्ठ शाश्वत तत्त्वात जाहला ऐक्य संयमी
शिवाविण न पाहेचि रमे आत्मसुखी सदा ११६८

**लिंगस्थलांतर्गत शरणस्थल संपूर्ण**



# लिंगस्थलांर्तगत ऐक्यस्थल

## ९३. स्वीकृतप्रसादैक्यस्थल

जीवेश्वरांतला भेद मुख्यार्थ दर्शवीतसे
लक्ष्यार्थ बोधितो त्यांच्यातला अभेदही तसा ११६९

योग्याठायी नसे मुख्य आणि लक्ष्यार्थही कुठे
भेदाभेदचि त्यागूनि ज्ञानप्रसादस्वीकृत ११७०

त्रिपुटि-व्यवहारास चिच्छक्ती मूलकारण
साक्षात्कारे तिच्या योगी स्थिरला आत्मचिंतनी ११७१

अद्वैतबोध लाधूनि भेदाभेदहि त्यागिले
स्थिर जो चित्प्रकाशात त्यास बंधन कोठले ११७२

काष्ठे अग्नीतली जैसी अग्निरूपचि जाहली
शिवाग्नीत तसे सर्व ब्रह्मरूप दिसे जग ११७३

पृथ्वी ना जल ना तेज नच आकाश वायुही
दिसती ना शिवाहूनि तत्त्वे ती भिन्न कोणती ११७४

ज्योतिर्लिंग चिदाकाशी प्रकाशे जे निरंतर
त्यात विलीन तत्त्वांस करी तो लिप्त होइना ११७५

अंतर्मुख मने स्वात्मज्योतीमध्येचि चिन्मय
पदार्थ अर्पुनी योगी आत्मानंदेचि तोषतो ११७६

सच्चिद्रूप समुद्रात स्वात्मरूप शिवामधे
अर्पूनि सर्वही स्वीकारितो प्रसादरूप ते ११७७

## ९४. शिष्टौदनस्थल

झाल्यावरी शिवज्ञान माया किंचित जी उरे
चिल्लिंगात विरे तीही ज्ञानानंतर पूर्णतः ११७८

अवशिष्ट जसे अन्न भोजनोत्तर राहते
अधोमाया तशी योग्यासाठी शिष्टौदनासम ११७९

कलादिभूमिपर्यंत मायेच्या तीस बंधने
बांधिले जग आत्म्याच्या ज्योतीत लीन होय ते ११८०

तत्त्वांस मूळ ती माया राहते अवशिष्टचि
तीच योग्याप्रती भासे शिष्टौदनासमानचि ११८१

सच्चिदानंदरूपी त्या ब्रह्मात ऐक्य पावला
जीवन्मुक्तापुढे माया दासी होऊनि राहते ११८२

विश्वसंमोहिनी माया शक्तियुक्त निरंकुश
पुढे येई न योग्याच्या रूप घेऊनि मोहक ११८३

ज्योतिर्लिंगात निमग्न शिवयोग्याकडूनि जे
भोग्य विषय जे सर्व जाती लयास ते स्वये ११८४

भोगिती इंद्रिये त्याची शब्दादी विषयांस ज्या
लीन आत्म्यात होती ते सागरी सरिता जशा ११८५

पदार्थ ग्रासुनी सर्व योगी प्रशांत होतसे
आवरूनि जसे तेज सूर्य अस्ताचली डुबे ११८६

## ९५. चराचरलयस्थल

पावे शिवैक्य योग्यात लय सर्व चराचर
विदेह्यास मिळे नाव चराचरविनाशक ११८७

अनादी अविद्यायोगाने प्रतीत विश्व होतसे
नाशे ती आत्मबोधाने मग दिसेल ते कसे ११८८

आकाशात जसे मेघ जन्मती लय पावती
तसे विषय आत्म्यात जन्मूनि पावती लय ११८९

जशी स्वप्नातली वस्तू जागता लय पावते
सांसारिक तसे पावे ज्ञान झाल्यावरी लय ११९०

सुषुप्तीच्या पुढे तूर्यावस्थेत पोचला तया
ज्ञेय-ज्ञान-प्रमाणाचे उरेनाचि प्रयोजन ११९१

वाणी-मनाहुनी दूर तूर्यातीत पदी स्थिर
शिवयोग्यास संसारप्रतीती होइना कधी ११९२

पाहेना अन्य काहीच योगी काही न जाणतो
ऐकेना अन्य तो काही चिदानंद शिवाविण ११९३

अभिन्न जग शंभूशी परि ते भिन्न भासते
अज्ञान नाशिता पूर्ण शिवरूपचि ते दिसे ११९४

## ९६. भाण्डस्थल

अनंत जन्मती आणि राहती लय पावती
ब्रह्मांडे ज्यात ती शक्ती भाण्ड नामे प्रशंसिती ११९५

विमर्श ती पराशक्ती करी विश्व प्रकाशित
सर्व तत्त्वांस ती साक्षी प्रकाशे सर्वतोमुख ११९६

विश्व जाते लया जेथे प्रकाशे आत्मतत्त्वही
आनंदरूप साक्षात असे विमर्श ती कला ११९७

पराहंतासमावेशे विमर्शवान होउनी
सर्वज्ञ सर्वसाक्षी नि सर्वकर्ता ठरे शिव ११९८

विश्वाधार महाज्ञान प्रकाशे परिपूर्ण ती
पराहंता असे ज्ञानी विमर्शालाच बोलिती ११९९

विमर्शरूप भांड्यात विश्वविस्तार ठेवुनी
अंतर्मुखे स्वरूपात योगींद्र होतसे स्थिर १२००

## ९७. भाजनस्थल

असे कारण विश्वाच्या सर्ग-स्थिति-लयास जी
शक्ती ती ज्यात सुस्थिर शिव तो विश्वभाजन १२०१

वैचित्र्यपूर्ण विश्वाला कारणीभूत जी असे
स्थिर ती ज्या शिवामध्ये ब्रह्म ते विश्वभाजन १२०२

मूलाहंकार रूपाने विश्वांकुरास कारण
शक्ती ती भासते जेथे ब्रह्म त्यालाच बोलिती १२०३

प्रकाशिते जशा वस्तू चंद्रामधील चांदणे
शिवशक्ती तसे विश्व एकांशाने प्रकाशते १२०४

अकार बोलिती शंभू शक्ती हकार जाण ती
शिवशक्तिमयी ब्रह्म अहंपदी समावले १२०५

शिवशक्तिमयी स्थिर पराहंताचि लाभता
ब्रह्मरूपचि तो योगी विश्वरूपे प्रकाशतो १२०६

पत्रपुष्पादि वृक्षाचे वसे बीजात सुप्त ते
तसे हृदयबीजात योग्याच्या विश्व राहते १२०७

## ९८. अंगालेपस्थल

देशकालादि मर्यादाविना चिन्मयरूप जो
योगी प्रख्यात जाणावा अंगालेपस्थली जगी १२०८

आत्मा तो सर्व विश्वाचा ज्ञानरूप महामती
संसारी लिप्त होईना जसे धुरामुळे नभ १२०९

नसे विधिनिषिद्धादी नसे विकल्प वासना
नसे कर्मांत प्रवृत्ती राहे चिद्रूप होउनी १२१०

घटामठांमुळे जैसे भिन्न आकाश होइना
तसे देही दिसे भिन्न तरी भंगे न ब्रह्महो १२११

जसे शाश्वत आकाश प्रकाशते निरूपम
ब्रह्मचैतन्यही तैसे चिदाकाश प्रकाशते १२१२

न देवत्व मनुष्यत्व पशुपक्षित्वही नसे
परिपूर्ण चिदाकाश योगी होऊनि राहतो १२१३

## ९९. स्वपराज्ञस्थल

चिद्रूप ब्रह्मरूपात अद्वैती लीन जाहला
स्वत:स आणि लोकांस कसे मानील वेगळे १२१४

नसे मी तू असा भेदभ्रम किंचितही जिथे
नसे वियोग संयोग ज्ञेयज्ञाताहि तो नसे १२१५

नसे बंध नसे मुक्ती देवत्व-अभिमानही
नसे सुख नसे दु:ख ज्ञान-अज्ञानही नसे १२१६

न श्रेष्ठत्व न हीनत्व नच अध: नि ऊर्ध्वही
मागे नाही पुढे नाही दूर समीपही नसे १२१७

सर्वरूप चिदानंद सद्रूप आणि शाश्वत
परब्रह्म पराकाशरूप ब्रह्मात निर्मल १२१८

एकरूप जहालेल्या योग्याठायी महान त्या
आप-पर असा भाव विनोदनासही नुरे १२१९

भेदांपलीकडे तेजोरूपात जो समावला
स्व-पराचे नसे ज्ञान तेणे स्व-पर अज्ञ तो १२२०

## १००. भावाभावलयस्थल

मी तू भाव जिथे नाही शून्य चिदंबरात त्या
सामावला तयाठायी भावाभावकथा कुठे १२२१

अहंभाव असो देही किंवा अभावही असो
त्याच्याठायी न दोन्हीही स्वस्वरूपी प्रकाशतो १२२२

नसेचि सुखदु:खादी भाव किंवा अभावही
चिद्रूपाप्रति तेणे तो भावाभावलयस्थली १२२३

भावाभावास त्यागूनि आत्मरूपात मग्न तो
सद्रूप वा असद्रूप दिसेना त्यास किंचित १२२४

लिंगैक्य शिवयोग्यास भावाभाव जगातले
नसती म्हणुनी तोच भावाभावलयस्थली १२२५

## १०१. ज्ञानशून्यस्थल

स्व आणि पर-सापेक्ष भावाभावविवेचक
नसे ब्रह्मात हे ज्ञान म्हणूनि ज्ञानशून्य तो १२२६

मिळे जल जलामध्ये अग्नी अग्नीमधे जसा
तसा ब्रह्मात लीनात्मा दिसेना भिन्न त्याहुनी १२२७

प्रपंचरूप ब्रह्मात भेदशंका नसे जिथे
ज्ञातृज्ञेयादि व्यापार तेथे होईल तो कसा १२२८

निर्विकार निराकार नित्य निस्सीम ब्रह्म ते
वर्जूनि सर्व भेदांस आकाशासम स्थिर ते १२२९

नच पृथ्व्यादि भूते ती नाही ग्रह न तारका
नच देवमनुष्यादी नाही पक्षी पशू कुणी १२३०

सच्चिदानंदरूपी ते चिद्रूप ब्रह्म केवल
मी-तू ह्या भेदज्ञानास भावील कोण तो तिथे	१२३१

नसेचि ज्ञेयवस्तू ती म्हणूनि ज्ञानशून्य ते
ज्ञेय ज्ञाता नसे तेणे ज्ञानगुणेहि शून्य ते	१२३२

आदिमध्यान्त ते शून्य सर्वदिक्काल शून्य ते
दुजा पदार्थ तो नाही तेणे शून्यचि शून्य ते	१२३३

सच्चिदानंद तेजस्वी अद्वितीय विलक्षण
शून्यासम पराकाश प्रकाशे परब्रह्म ते	१२३४

ज्ञानसंकल्पही शून्य पुरुषार्थहि शून्यचि
ज्योतिर्लिंग चिदाकार चिद्रूप एकमेव ते
त्यात जो जाहला ऐक्य संभवे ज्ञान ते कसे	१२३५

नसे कार्यदशा आणि कारणत्वहि ते नसे
नसे शेषत्व-शेषित्व योगी तो परमुक्तचि	१२३६

**लिंगस्थलांतर्गत ऐक्यस्थल संपूर्ण**



# उपसंहार

## शास्त्रप्रचाराचा आदेश

शिवाने कथिले पूर्वी पार्वतीला निगूढ जे
अद्वितीय शिवाद्वैत शिवानंदप्रकाशक १२३७

रहस्य ते अगस्त्यास संपूर्ण प्रतिबोधुनी
गणेंद्र रेणुकाचार्य ध्यानस्थ मौन राहिले १२३८

धानस्थ रेणुकाचार्या पाहूनि कर जोडुनी
भावविव्हल होऊनि मुनी अगस्त्य बोलिले १२३९

### अगस्त्य म्हणाले

शिवयोगविशेषज्ञा गणेंद्रा ज्ञानसागरा
समस्त वेदशास्त्रांत निष्णात पूर्ण केवळ १२४०

गळती दृष्टिक्षेपाने सर्व संसारबंधने
स्वच्छंदे वर्तता भूमीवरी सर्वत्र आपण १२४१

शास्त्र हे वीरशैवांचे आज संपूर्ण बोधिले
ऐकूनि धन्य मी झालो तोषलो पूर्ण मानसी १२४२

लाधले जन्मसाफल्य पळाला चित्तविभ्रम
गळाली बंधने आज तपाला लाभले फळ १२४३

ऋषिगणांत मी श्रेष्ठ ठरलो आज निश्चित
त्रिलोकांत कुणी नाही उरला मजसारखा १२४४

ऐकाया शिवशास्त्रास तपाचे लागते बळ
जाहले पक्व ते माझे म्हणूनि भाग्यवान मी १२४५

कृतार्थ अनुग्रहाने कराया मज भूवरी
अवतार गणेश्वरा केला आपण धारण १२४६

### श्रीरेणुकाचार्य म्हणाले

मुनींत श्रेष्ठ तू सर्व फळा आले मनोरथ
कोण तुझ्याविना शास्त्र ऐकावयास पात्र तो १२४७

पात्र शंभुप्रसादास असशी एक तू जगी
म्हणूनि बोधिले शास्त्र तुलाच पूर्ण निश्चये १२४८

सर्व लोकांत हे शास्त्र करावे तूचि स्थापन
नसेचि शिवज्ञानास अन्य साधन कोणते १२४९

लाभाया सर्व लोकांना भोग आणिक मोक्ष तो
कृपाळू शिवशंभूने शास्त्र हे उपदेशिले १२५०

सार शैवागमांचे हे उत्तमांतील उत्तम
सर्वस्व वेदशास्त्रांचे ज्ञान-क्रियेस बोधिते १२५१

वीरमाहेश्वरा ग्राह्य शिवाद्वैत प्रकाशते
परीक्षूनीच शिष्यास बोधावे अन्य ना कुणा १२५२

सिद्धान्त वीरशैवांचा उत्कृष्ट शुद्ध मानसे
करी श्रवण जो त्याला परमुक्तीच लाभते १२५३

नाशिती पातके सर्व ऐकता शिवशास्त्र हे
अवतीर्ण इथे झालो शास्त्रप्रवर्तनास ह्या
असे हे शास्त्र बोधावे तूही जनांस भूवरी १२५४

## त्रिकोटिलिंगस्थापना

बोलूनि पावले ऐसे अंतर्धान जगद्गुरू
पाहात राहिले तेथे मुनी होऊनि विस्मित १२५५

स्वेच्छेने भ्रमती लोकी करिती देहधारण
लंकेत पातले श्रेष्ठ गणनायक रेणुक १२५६

आला धावूनि लंकेचा विभीषण नृपेंद्र तो
आणूनि राजप्रासादी सन्मानिले यथोचित १२५७

निजसिंहासनी रम्य बैसवी परमादरे
पूजिले अर्घ्यपाद्यादी उपचारे गणेश्वरा १२५८

बैसूनि आसनी दूज्या कर जोडूनि राहिला
विद्याविनयसंपन्न बोलिला रेणुकांप्रती १२५९

**विभीषण म्हणाला**

महाराजा गणाधीशा शिवज्ञानपरायणा
अवतीर्ण जगी झाला असे आधीच ऐकिले १२६०

भाग्येच माझिया आज आला लंकेत आपण
भाग्यहीनास संतांचे कसे होईल दर्शन १२६१

शिव प्रत्यक्ष प्रासादी आले रूपेचि आपुल्या
भाग्यवंत नसे कोणी त्रिलोकी मजसारखा १२६२

कृतार्थ जाहलो मी नि माझा राक्षसवंशही
आपुल्या दर्शने नाथा जन्मसार्थक जाहले १२६३

**श्रीरेणुकाचार्य म्हणाले**

विभीषणा तुला श्रेष्ठ धर्मज्ञ मानिती जगी
तुझ्यासमान त्रैलोक्यी दिसेना भक्ति आगळी १२६४

जाणसी सार शास्त्रांचे शिवाचारात तत्पर
आसक्त आत्मविद्येत असे सर्वत्र बोलिती १२६५

ऐकूनि धर्मकीर्तीस तुझ्या विस्मित जाहलो
कैलासपर्वती जाता पावले वळली इथे १२६६

झालो चरित्र ऐकूनि प्रसन्न मानसी अती
मनी तुझ्या वसे इच्छा माग होईल पूर्ण ती ॥ १२६७

विभीषण म्हणाला

शिवभक्तांमधे श्रेष्ठ प्रतापी बंधु रावण
इंद्रादिकांस शासूनि पृथ्वी निर्वैर भोगिली ॥ १२६८

कालगतीमुळे झाला चारित्र्यहीन एकदा
संग्रामी वधिला रामे रणात बोलिला मज ॥ १२६९

कंठात आणुनी प्राण म्हणे धार्मिक बांधवा
दैत्यवंशात तू एक आहे जिवंत भूवरी ॥ १२७०

अज्ञाने ग्रस्त मी झालो मोठ्यांशी द्रोह मांडिला
दैवे ओढवला मृत्यू दैवगतीच दुस्तर ॥ १२७१

संकल्प नव कोटी ती लिंगे लंकेत स्थापिणे
केला तरी सहा कोटी लिंगे मी स्थापिली इथे ॥ १२७२

तीन कोटी अजूनीही स्थापणे उरले असे
मृत्युपश्चात माझ्या तू स्थापावी बांधवा इथे ॥ १२७३

तत्काळ दिधला शब्द रणांगणात रावणा
सुखाने सोडिला प्राण रावणे गणनायका ॥ १२७४

परि संकल्प अद्यापि नसेचि पूर्ण जाहला
त्रिकोटी स्थापण्या लिंगे आचार्य ना मिळे कुणी ॥ १२७५

जाणते शिवशास्त्राचे तुम्हीच ज्ञानसागर
आचार्यरूप घेऊनि करावे पूर्ण ईप्सित ॥ १२७६

तथास्तु बोलिता सिद्ध संतोषला विभीषण
त्रिकोटी घेउनी रूपे लिंगे लंकेत स्थापिली ॥ १२७७

सामर्थ्य पाहुनी नेत्री चित्ती संतुष्ट जाहला
आदरे वंदिले त्याने रेणुकांस पुन:पुन्हा १२७८

कृपाशीर्वाद देऊनि विभीषणास रेणुक
जाहले गुप्त राजाही प्रजेच्या रत पालनी १२७९

तेजस्वी रेणुकाचार्ये केला संचार भूवरी
प्रच्छन्न रूप घेऊनि आणि प्रकटही तसे १२८०

केले कृपाकटाक्षाने किती कृतार्थ सज्जन
बोधूनिया शिवाद्वैत किती उद्धरिले जना १२८१

मलनाशक सान्निध्ये केले कृतार्थ ते किती
पाखंडी खंडिली सर्व नास्तिक आदि दर्शने १२८२

स्थापिला शिवसिद्धान्त जना उद्धरिले किती
यंत्रमंत्रकलासक्त खंडिले सिद्ध सर्वही १२८३

शिवदर्शन-उत्कंठा जागताचि मनामधे
कोल्लिपाक पुरीमध्ये आले सवेग रेणुक १२८४

## सोमेश्वर लिंगात ऐक्य

सद्भक्तांसह राऊळी येऊनि स्थिर राहिले
सोमनाथास वंदूनि सद्भावे प्रार्थिती तया १२८५

देवदेवा जगन्नाथा ईश्वरा विश्वकारणा
वंदिती विष्णुब्रह्मादी देव तुझे पदांबुज १२८६

येती शरण तू त्यांची संसारभ्रांति नाशितो
वेदोपनिषदे गाती तुझे सदैव वैभव १२८७

वैद्य तू भवरोगाचा सर्वज्ञ नि निरंकुश
सच्चिदानंद सर्वस्वे परमाकाशरूप तू १२८८

विश्वाचा सर्व आधार ज्योतिर्लिंगी प्रकाशतो
सदाशिवादि रूपे ती करितो दिव्य धारण १२८९

नाशितो मलत्रयांस गुणत्रयांपलीकडे
त्रिलोकी क्रीडसी सौख्ये त्रिवेद तव लोचन १२९०

रक्ष रक्ष मला देवा ईश्वरा पार्वतीपते
आज्ञेने मी तुझ्या केला संचार सर्व भूवरी
आगमांस प्रकाशाया तूचि जे उपदेशिले १२९१

तुझ्या रूपात पावावे ऐक्य ही आस मानसी
अवकाश मला देई रूपी किंचित ईश्वरा १२९२

रेणुके बोलता ऐसे आला लिंगातुनी स्वर
वत्सा महानुभावा ये भक्तीने तुष्ट जाहलो १२९३

आश्चर्य दाटले चित्ती भक्तांच्या मंदिरात जे
घुमे दुंदुभि आकाशी पुष्पवर्षाव जाहला १२९४

न्हाले रेणुक तेजात लिंगात ऐक्य पावले
भक्त गाती स्तुती सर्व नेत्री आश्चर्य दाटले १२९५

वायूमध्ये विरे जैसा कर्पूर जाहले तसे
झाले सोमेश्वरामध्ये एकरूपचि रेणुक १२९६

शिवभक्ती ठरे श्रेष्ठ प्रमाणे ह्या जगामधे
शिवशास्त्र असे दिव्य ग्रंथी या प्रतिपादिले १२९७

सिद्धान्त षट्स्थलांचा हा वेदागमांत बोलिला
एकोत्तर शते येथे स्थले ती प्रतिपादिली १२९८

वेदागमांतला वीरशैव सिद्धान्त मानिते
शुभ षट्स्थलरूपीच तेजस्वी रत्न हे जणू  १२९९

जीव-ईश्वरयोगाचे विकासे पद्म हा रवी
दाविते शिवसंपत्ती रत्न चिंतामणीच हे  १३००

स्वहस्ते लिहितो ग्रंथ घेतसे लिहवूनि वा
ऐके ऐकवितो त्याला भुक्ती नि मुक्ति लाभते  १३०१

**रेणुकगीताई संपूर्ण**



## समारोप

काशीपुरीमधे श्रेष्ठ रम्य जंगमवाटिका
तेथे मठामधे झाले पूर्ण हे ग्रंथलेखन १

काशी विश्वेश्वरा आणि विश्वाराध्यांस वंदितो
पंचाचार्य कृपेनेच पूर्णत्व लाभले इथे २

काशीजगद्गुरूंचेही लाभले मज आशिष
कृपेने जाहलो त्यांच्या समर्थ लेखनास मी ३

विठाबाई गुणी माता देवाप्पा पितृदैवत
वंशात जन्मलो त्यांच्या भाग्यवशात माझिया ४

आचार्य सिद्ध सर्वांस मायपित्यांस वंदितो
शेषनारायणाचेही झाले कृतार्थ जीवन ५



# रेणुकगीताई : अभिप्राय

ही श्रीरेणुकगीताई श्रीसिद्धान्तशिखामणी
बोधिली रेणुकाचार्ये अगस्त्य या मुनीश्वरा ।।१।।

ग्रंथ संस्कृत भाषेत हा मराठीत आणिला
कृतीने धन्य झाली ही भाषा समृद्ध उज्ज्वल ।।२।।

अनुष्टुप् छंद माधुर्ये सर्व छंदांत अग्रणी
पहावा वीरशैवांनी श्रद्धेने आदरे तसा ।।३।।

ज्ञानसिंहासनाधीश जगद्गुरु महामना
प्रेरक वीरशैवांचे चंद्रशेखर जाणते ।।४।।

तदाज्ञे रचिली शेषे प्रतिभेचा महाधनी
उपकृत कृतीने या होवोत शैव धार्मिक ।।५।।

सौंदर्यपूर्ण हा झाला अलंकारे समुज्ज्वल
अवतार नवा वाटे अद्भुतापूर्व अमृत ।।६।।

गती ज्यास असे शास्त्री कवित्वी रससाधनी
त्यांनीच लेखणी घ्यावी हाती भाष्य करावया ।।७।।

प्रज्ञा तीव्र असे ज्याची प्रतिभाही नवी नवी
असामान्य गुणे शेष वीरशैवाग्रणी कवी ।।८।।

अभिप्राय शिवे केला नमूनी चंद्रशेखरा
आशिष मजही द्यावा वाचण्या शेष-अक्षरे ।।९।।

– पं. शिवाप्पा खके
चारठाणा (परभणी)

‘श्रीसिद्धान्तशिखामणी’ ह्या मूळ संस्कृत अनुष्टुभ् छंदातील ग्रंथाचे त्याच छंदामध्ये मराठीकरण केलेली ‘रेणुकगीताई’ ही एक अपूर्व कृती आहे.

सोळाव्या शतकापासूनचे वीरशैव मराठी साहित्य उपलब्ध झाले असून या साहित्यातील ‘रेणुकगीताई’ ही पहिली अनुष्टुभ् छंदोबद्ध कृती आहे. या ग्रंथामुळे डॉ० शे० दे० पसारकर हे मराठी वीरशैव साहित्यातील अनुष्टुभ् छंदोरचना करणारे आद्यकवी ठरले आहेत.

डॉ० पसारकरांनी विपुल लेखन केले आहे. त्यांच्या साहित्यसंपदेमुळे वीरशैव मराठी साहित्य अतिशय समृद्ध झालेले आहे. प्रस्तुत ‘रेणुकगीताई’ हे त्याचेच एक उदाहरण होय.

मूळ संस्कृत भाषेतील ‘श्रीसिद्धान्तशिखामणी’चे वाचन करताना संस्कृत वाचकांना जो आनंद मिळतो तोच आनंद ह्या ‘रेणुकगीताई’मुळे मराठी वाचकांना मिळणार आहे.

-श्रीकाशीजगद्गुरू डॉ० चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी


* ग्रंथासाठी संपर्क *

विद्या साहित्य
५०, नवी पेठ,
मयूर साठी सेंटर जवळ,
सोलापूर – ४१३००७.
फोन : ०२१७-२७२२०२१

एस. के. हिरेमठ
५५/४०, शाहीर वस्ती
भवानी पेठ,
सोलापूर – ४१३००२
मो. : ०९९६०२२२१५१